# फडक्यांच्या शब्दांत फडके


सम्पादक

आनन्द नारायण नारळकर

कृष्णाजी गणेश भागवत



पु. रा. भिडे आणि कंपनी

लक्ष्मी रोड, पुणें २

प्रा. फडके यांचें वाङ्मय वाचत असतांना त्यामध्यें आत्म-चरित्राचे पडसाद उमटत आहेत असें सारखें वाटत होतें. 'माझ्या आयुष्याचा माझ्या लेखनावरील परिणाम' या लेखाच्या शेवटच्या वाक्यानें तर ही कल्पना दृढच झाली. यावरून त्यांच्याच शब्दांत त्यांचें व्यक्तिदर्शन करण्याची कल्पना सुचली. आमच्या शाळेच्या सम्मेलनाला सन्माननीय पाहुणे म्हणून प्रा. फडके आले होते त्या वेळीं ही कल्पना श्री. ना. ग. नारळकर, मुख्याध्यापक, नू. म. वि. हायस्कूल, यांच्या प्रोत्साहनानें मूर्त स्वरूपांत आणली. प्रा. फडके यांनाहि पण ही कल्पना नावीन्यपूर्ण वाटली व पुस्तकरूपानें छापून काढण्यास त्यांनीं आनन्दानें परवानगी दिली.

बारिक ठशांतील व कंसांतील मजकूर आमचा. बाकी **सर्व मजकूर प्रा. फडक्यांचा.**

पुणें
४ मे १९४०

**आनन्द नारायण नारळकर**
**कृष्णाजी गणेश भागवत**

[ सर्व पुस्तक स्वदेशी कागदावर छापलें आहे. ]

ढोकळ मानानें खालीलप्रमाणें भाग केले आहेत व
शक्य तितका एकसूत्रीपणा राखण्याचा
प्रयत्न केला आहे.





# बा ल प ण

## १

[प्रो. नारायण सीताराम फडके, एम्. ए., हे मराठी भाषेंतील एक नाणावलेले लेखक आहेत ही गोष्ट सर्वांस विदितच आहे; परंतु त्यांची कला प्रयत्नसाध्य आहे.]

लेखक होण्याचें ध्येय लहानपणीं, इतकेंच काय वयाच्या तिसाव्या वर्षापर्यंतहि, माझ्या दृष्टीसमोर होतें असें मला वाटत नाहीं. मी लहानपणापासून मराठी वाङ्मय पुष्कळ वाचीत असें हें खरें, पण आपण लेखक व्हावें व नांव मिळवावें असें मला वाटल्याचें आठवत नाहीं. आम्हीं न्यू पूना कॉलेज म्हणजे सध्याच सर परशुरामभाऊ कॉलेज स्थापन केलें त्या वेळीं माझा व कै. हरिभाऊ आपट्यांचा कांहींसा निकट संबंधहि आला. पण त्या थोर कादंबरीकाराच्या सान्निध्यांतसुद्धां आपण कादंबरी-

कार व्हावें अशी मनीषा माझ्या मनांत उद्भवली नाहीं; मग आपण कादंबरीकार होऊं अशी खात्री तर दूरच !

बुद्धिपुरस्सर केलेल्या प्रयत्नांपेक्षां योगायोगानें आलेल्या प्रसंगांसच माझ्या आजपर्यंतच्या लेखनाचें श्रेय द्यावयास मी तयार आहें. कांहीं उदाहरणें सांगितलीं तर वाचकांची याविषयीं खात्री पटावयास हरकत नाहीं. ज्याप्रमाणें बी. ए. च्या वेळीं फिलॉसॉफी या विषयाबद्दल मला विशेष आवड होती म्हणून नव्हे, तर त्या विषयास एक मोठें बक्षिस होतें म्हणून, आवडीचा इंग्रजी विषय सोडून मीं तो विषय घेतला व बक्षिस मिळविलें त्याप्रमाणेंच मीं माझें पहिलें मराठी पुस्तक लिहिलें तें स्वयंस्फूर्तीपेक्षां युनिव्हर्सिटीचें एक बक्षिस मिळविण्याच्या ईर्षेनें. हें पुस्तक म्हणजे 'दादाभाई नवरोजी यांचें चरित्र' होय. तसेंच 'मानसोपचार' व 'मानसोन्नति' हे दोन ग्रंथ मीं अत्यंत मन लावून व नमुनेदार करून दाखविण्याच्या महत्त्वाकांक्षेनें लिहिले, तरी त्या ग्रंथांचें खरें श्रेय त्या वेळची माझी बेकारी, आणि डॉ. गणपुले यांची व माझी योगायोगानें पडलेली गांठ यांसच दिलें पाहिजे. त्यानंतरची 'कुलाब्याची दांडी' ही कादंबरी देखील त्या सुमारास योगायोगानें माझा व श्रीयुत अ. स. गोखले यांचा परिचय झाला, व मला उद्योगाची गरज होती म्हणूनच लिहिली. इतकेंच काय, कदाचित् या कादंबरीवरच माझें कादंबरीलेखन संपुष्टांतहि आलें असतें, परंतु 'रत्नाकर' मासिकाची स्थापना केल्यानंतर दुसऱ्या वर्षापासून त्या मासिकांत कादंबरीचें सदर सुरू करणें अवश्य वाटलें, व 'दुसऱ्या

कोणाला विनंति करण्यापेक्षां तुम्हींच कादंबरी लिहा' असा श्रीयुत गोखले व इतर कांहीं मित्रांनीं आग्रह केला, म्हणूनच 'जादूगार' कादंबरी मीं लिहावयास घेतली.

येथपासून पुढें मात्र 'लेखक व्हावें' अशी स्पष्ट महत्त्वाकांक्षा मीं धरली. म्हणजे असेंहि कोणीं म्हटलें तरी मला वाईट वाटणार नाहीं, कीं कादंबरीकार होण्याची महत्त्वाकांक्षा माझ्या ठायीं पहिल्यापासून होती म्हणून नव्हे, तर 'जादूगार' कादंबरी लिहिल्यानंतर माझ्या सामर्थ्याचा मला प्रत्यय आला; व लौकिकाची चटक लागली, म्हणूनच त्यानंतरचें सर्व लेखन माझ्या हातून झालें.

हें जसें खरें तसें माझ्या लेखनांत, वर्णनशैलींत, भाषाप्रकारात जे कांहीं गुणदोष असतील, अथवा जीं मतें ध्वनित अगर प्रतिपादित केलीं जात असतील त्यांचेहि धागेदोरे माझ्या आयुष्यात योगायोगानें पडलेल्या सुखदुःखमय प्रसंगात व स्थित्यन्तरातच सांपडण्यासारखे आहेत.

१९१० सालीं मी असहकारितेच्या चळवळींत पडलों तेव्हांपासून तों १९२६ सालच्या उत्तरार्धांत कोल्हापूरच्या सध्याच्या नोकरीवर रुजू झालों तोंपर्यंत माझे दिवस कमी-अधिक प्रमाणांत बेकारावस्थेंत व भ्रमणांत गेले. तो काळ प्रत्यक्ष कंठीत असतां मला अत्यंत तापदायक झाला. परंतु त्या काळांतच लेखनाला अत्यंत आवश्यक व पोषक अशी तपश्चर्या माझ्या हातून अजाणता घडली असें आज मी निश्चयानें सांगं शकतों.

१९१९ पासून तों १९२६ पर्यंत अशा अनेक चमत्कारिक योगायोगांचा मला लागोपाठ अनुभव आला, व मला कितीतरी स्थलान्तरें करावीं लागलीं. पण आयुष्याच्या या तऱ्हेमुळें माझ्या लेखनाची केवढी तरी तयारी होत होती!

कारण या अवधींत अमदाबाद, दिल्ली, अलिगड, मिरत, कराची, हैदराबाद, भावनगर, झांशी, मथुरा, बनारस, आग्रा अशा अनेक शहरांतून माझें वास्तव्य झालें, व कादंबरीकाराला अत्यंत आवश्यक असा प्रवास माझ्या हातून घडला. माझ्या कादंबऱ्यांत वाचकांनीं रमावें यास माझ्या मतें एक मोठें कारण असें आहे, कीं त्यांत निरनिराळ्या शहरांचीं व स्थळांचीं वर्णनें त्यांना वाचावयास मिळतात. ही गोष्ट 'जादुगार' लोकप्रिय झाल्यापासून मीं मनानें टिपून ठेवलेली आहे, व त्यानंतरच्या प्रत्येक कादंबरींत वाचकांची ही हौस पुरविण्याचा मीं हेतुपुरःसर प्रयत्न केला आहे. माझ्या कोठल्याहि कादंबरींतील कोठलेंहि स्थळ प्रत्यक्ष मीं पाहिल्यावांचून वर्णिलेलें नाहीं. वर ज्या स्थळांचा निर्देश केला, त्यांचीं वर्णनें माझ्या वाचकांस निरनिराळ्या कादंबऱ्यांतून वाचावयास मिळालीं आहेत. तीं त्यांस मनोवेधक वाटलीं असल्यास त्याचें कारण एकच : माझें त्या त्या शहरांतील प्रत्यक्ष वास्तव्य ! आणि वास्तव्याचें कारण मला भोगावी लागणारी बेकारी !

[साहित्य आणि संसार : माझ्या आयुष्याचा माझ्या लेखनावरील परिणाम. ११४-११६]

जी गोष्ट वर्णनांची तीच मला वाटतें माझ्या लेखनाच्या

इतर अंगांची. लहानपणापासून माझ्या घरांत व आप्तेष्टांत जुन्या वळणाचीं माणसें मी पाहात आलों. मला समजूं लागलें तेव्हां-पासून एक विचार माझ्या मनांत सारखा येऊं लागला, तो हा, कीं जुन्या राहणींत व आचारविचारांत इतर कितीहि चांगल्या गोष्टी असल्या, तरी नित्याच्या संसारांतील स्वारस्याकडे आणि आनंदाकडे जुन्या वळणाच्या माणसांकडून लक्ष पुरवलें जात नाहीं. ही माझी कल्पना नेहमीं बळावत गेली, आणि १९२०-२१ सालच्या सुमारास दिल्लीच्या सेंट स्टीफन्स कॉलेजांत प्रोफेसर म्हणून असतांना जेव्हां बराच काळ मी एका इंग्रज कुटुंबात राहिलों, व त्यांच्या आप्तेष्टांच्या परिवारांत मिसळलों, तेव्हां तर माझी कल्पना पूर्णावस्थेस पोहोंचली असें म्हणा-वयास हरकत नाहीं. या माझ्या विचारसरणीचा प्रत्यय कांद-बऱ्यांत वाचकांस खचित आला असेल. माझ्या इतर मतांचीही गोष्ट अशीच आहे.

[साहित्य आणि संसार : माझ्या आयुष्याचा माझा लेखनावरील परिणाम. ११७]

[जरी फडक्यांचें ऐन पंचविशींत विलक्षण भ्रमण झालें होतें तरी बालपण निराळ्या परिस्थितींत गेलें. मुलाचे पाय पाळण्यांत दिसले नाहींत.] ते म्हणतात,

माझे वडील मामलेदार असल्यामुळं माझ्या वयाचीं पहिलीं नऊ वर्षं निरनिराळ्या तालुक्याच्या शहरात गेलीं. त्या काळीं असल्या खेडवळ शहरांतल्या शाळा काय नमुन्याच्या असतील त्याची कल्पनाच केलेली बरी. पण माझ्या वडिलांनीं जरी

नेमानं शाळेंत जाण्याची शिस्त मला वयाच्या पांचव्याच वर्षा-पासून लावली तरी माझं शिक्षण मात्र त्यांनीं शाळेवर अव-लंबून ठेवलं नाहीं; किंवा मला शिकवायला एक मास्तर ठेवून ते मोकळे झाले नाहींत. ते स्वत: रोज नियमानं मला शिक-वीत असत.

माझ्या बुद्धीच्या तीव्रतेचा आणि अभ्यासूपणाचा एकंदर इतिहास कांहींसा चमत्कारिक आहे. सुमारें वयाच्या दहाव्या वर्षापर्यंत मला अभ्यासाची अतिशय हौस होती. वयाच्या पांचव्या वर्षी मी एकोत्रीपर्यंत उजळणी उलट्या क्रमानं सहज म्हणत असें. पण पुढं चार वर्षांचा अवधि असा येऊन गेला, कीं शाळेच्या अभ्यासक्रमांतल्या कुठल्याच विषयात मला गोडी वाटेना. अभ्यासावरचं माझं लक्ष अगदीं उडालं, अन् माझं मलाच वाटूं लागलं, कीं विद्येत आपली विशेष गति होणं शक्य नाहीं. इंग्रजी चवथीच्या वार्षिक परीक्षेत मला गणित विषयांत शभरापैकीं शून्य मार्क मिळाला. लोकांनीं ठरविलं, कीं बाबासाहेब फडक्यांचा हा मुलगा चांगला निघणं शक्य नाहीं. माझे वडील अर्थातच मनातल्या मनात अत्यंत विपण्ण झाले असले पाहिजेत. पण मी इंग्रजी पांचवींत गेल्यानंतर माझी वृत्ति एकदम पालटली. गणित विषयाकडे चांगलं लक्ष पुरविण्याचं मीं ठरविलं; साऱ्याच विषयांत मला गोडीहि वाटूं लागली; इंग्लिश व मराठी भाषांतल्या माझ्या विशेष प्रगतीचं शिक्षकांकडून विशेष कौतुक व्हायला लागलं; आणि माझ्या बुद्धीवर आलेल्या मंदपणाचा आणि अभ्यासाविषयींच्या अना-

स्थेचा काळ मग संपला. मी कॉलेजमध्यें गेल्यावर तर विशेष हुशार व होतकरू विद्यार्थी म्हणून ओळखला जाऊं लागलों.

लहानपणीं माझ्या अभ्यासूपणावर घरांतली सारी मंडळी खूश होती. शिवाय मी एकुलता एक मुलगा होतों. त्यामुळें साहजिकपणेंच घरीं माझं फार कौतुक होत असे. बाहेर तर काय! मामलेदाराचा मुलगा, अन् शिवाय हुशार! मी पांच वर्षांचा असतांना आमच्या वर्गांत आलेल्या दिपोटींनीं खिशां-तलं छोटं घड्याळ काढून किती वाजले म्हणून प्रत्येक मुलाला विचारलं, अन् चटकन् बरोबर उत्तर देणारा मीच काय तो निघालों. मग काय विचारतां! त्या दिवशीं गांवांत ज्याच्या त्याच्या तोंडीं तोच विषय. पण माझ्या वडिलांनीं माझं भलतं कौतुक कधींच केलं नाहीं. एकदां ज्या शिपायाबरोबर मी शाळेंत जात येत असें त्यानं वाटेंत चिवडा घेऊन मला खायला दिला. माझ्या वडिलांना ही गोष्ट कळतांच त्यांनीं त्या शिपायाला चांगला बडवून काढला. हा मार वास्तविक मलाच मिळायचा, पण मी वयानं अगदींच लहान होतों म्हणून माझी गय झाली असावी. कारण पुढें दोन वर्षांनीं मी आमच्या घरच्या शिपायाबरोबर त्याच्या मळ्यांत जाऊन कलिंगडं खाल्लीं तेव्हां वडिलांनीं त्या शिपायाऐवजीं मलाच जन्माची आठवण राहील असा मार दिला. अत्यंत निस्पृह मामलेदार अशी स्वत:ची कीर्ति कायम ठेवण्याचा माझ्या वडिलांचा सतत प्रयत्न असे.

माझ्या वडिलांना पशुपक्ष्यांचा विलक्षण नाद होता. कुत्रीं,

माकडं, पोपट, साळुंक्या, मोर आमच्या घरांत नेहमीं असत. माझे वडील दुपारीं निजले कीं दोनतीन मोर त्यांच्या अंथरुणावर असत, आणि ढेकूण, चिलटं इत्यादींची त्यांची शिकार चालू असे. एकदां जिना उतरतांना माझा लाडका कुत्रा माझ्या पायांत घोटाळला, अन् मी सबंध जिन्यावरून गडगडत खालच्या पायरीवर आपटलों. माझ्या डाव्या हाताचं हाड मोडलं. दोन महिनेपर्यंत माझा हात गळ्यांत बांधलेला होता. माझ्या डाव्या हाताचा अधूपणा अजूनहि किंचित् अंशानं कायम आहे. क्रिकेट खेळतांना मी बोलिंग पुष्कळ बऱ्यापैकीं टाकतों. पण बॅटिंग करूं लागलों कीं डाव्या हाताच्या मनगटांतून अन् कोपरांतून शिणका निघूं लागतात.

माझ्या वडिलांना स्वत: कीर्तन करण्याचा फार षोक होता. ते कीर्तन चांगल्यापैकीं करीत, आणि कीर्तनाचा पूर्वरंग तर फार बहारीनं सांगत. त्यांनीं कित्येक आख्यानं स्वतंत्रपणं लिहून तयार केलीं होतीं, आणि त्यांतलीं पदं स्वत: रचलीं होतीं. हीं त्यांचीं पदं म्हणजेच माझा व संगीताचा पहिला परिचय होय, माझे वडील कुठल्याहि गांवीं बदलून गेले कीं आपल्या कचेरींत थोडं फार गाणारा एखादा कारकून आहे कीं नाहीं याची ते चवकशी प्रथम करीत; व तो सांपडला कीं त्याला ते घरीं आणीत आणि कीर्तनांतल्या पदांच्या तालमी आमच्या घरीं सुरू होत. माझ्या वडिलांची बदली झाली कीं कचेरींतल्या मंडळीं-कडून त्यांना पानसुपारी व्हायची हें जसं ठरलेलं तसंच गांवां-तल्या साऱ्या मंडळीसाठीं त्यांचं एक अखेरचं जाहीर कीर्तन

व्हायचं हेंहि ठरलेलं असे. या कीर्तनांच्याच निमित्तानं आमच्या घरांत प्रथम बाजाची पायपेटी आली. बाबांच्या कचेरींतला एक कारकून जेव्हां ती उघडून वाजवूं लागला तेव्हां अगदीं मंत्र-मुग्ध होऊन ती ऐकत मी उभा राहिलों!

माझी मुंज वयाच्या सहाव्या वर्षीं झाली, आणि आमचं वेदाध्ययन सुरू झालं. संध्या, वैश्वदेव, रुद्र इत्यादि ब्रह्मकर्मांची संथा मी घेऊं लागलों. मी कॉलेजांत गेल्यावरहि रोजचा वैश्व-देव माझ्याचकडे असे, आणि लघुरुद्राच्या वेळीं वडिलांच्या बरोबरीनं मला पठण करावं लागे. माझे वडील कर्मनिष्ठ पण चिकित्सक होते. उपाध्यावर सर्वस्वीं अवलंबून न राहतां दर श्रावणीच्या वेळीं ते स्वत: पोथी पुढं ठेवून मोठ्यांदा वाचीत, उपाध्येबुवा मधेंच चुकले तर लगेच त्यांना दुरुस्त करीत, आणि श्रावणीकर्मांतला प्रत्येक विधि सर्वांनीं अगदीं यथासांग करावा असा त्यांचा कटाक्ष असे. आमच्या घरच्या कीर्तना-प्रमाणंच आमच्या घरची श्रावणी गाजत असे. गांवांतले ऋग्वेद-शाखेचे सर्व ब्राह्मण त्या दिवशीं आमच्या घरीं हजर असत, आणि माझ्या वडिलांच्या दक्ष नजरेंतून सहीसलामत सुटतां सुटतां उपाध्येबुवांची मोठी तारांबळ उडे. श्रावणी जवळ आली कीं मला मोठं संकट वाटायचं. ते होम, तो धुर आणि तें पंचगव्य! पंचगव्याचीं आचमनं चुकविण्यासाठीं किती युक्त्या मला योजाव्या लागत असत! ब्राह्मणाकडचीं आयतीं यज्ञो-पवीतं विकत न घेतां माझे वडील तीं स्वत: टकळीवर काढीत. तीं गळ्यांत घातलीं कीं दोरखंडासारखीं वाटायचीं.

१९०३ सालीं माझ्या वडिलांनीं सरकारी शेतकी खात्यांत नोकरी धरली व आमचं बिऱ्हाड पुण्यास येऊन स्थिर झालं. न्यू इंग्लिश स्कूलमध्यें इंग्रजी पहिल्या इयत्तेंत मी ज्या दिवशीं दाखल झालों त्या दिवशीं गद्रेवाड्याची ती भव्य इमारत, तीस तीस चाळीस चाळीस विद्यार्थ्यांचे ते वर्ग, आणि प्रत्येक विषयाला वेगळे मास्तर, हेडमास्तर दृष्टीस पडतांच अगदींच अनोळखी वातावरणांत येऊन पडल्यासारखं मला झालं. मला वाटतं, अभ्यासावरून माझं चित्त उडण्याच्या क्रियेचा त्याच वेळीं प्रारंभ झाला. शिवाय आणखी एका गोष्टीची त्यांत भर पडली. मी फार हुशार, तेव्हां मी अगदीं अल्पवयांत मॅट्रिक झालं पाहिजे असं माझ्या वडिलांना वाटलं. त्यांनीं घरच्या घरीं माझ्या इंग्रजी तीन इयत्ता पुऱ्या करून घेतल्या, आणि १९०६ सालीं नूतन मराठी विद्यालयांत एकदम इंग्रजी चवथ्या इयत्तेंत मला बसविलं. त्या वेळीं मी बारा वर्षांचा होतों. इंग्रजी तीन इयत्ता घरीं केल्यामुळं भूगोल आणि गणित हे माझे दोन विषय बरेचसे कच्चे राहिले असावेत, आणि त्यामुळं इंग्रजी चवथींत होणाऱ्या अभ्यासाचा वेग मला झेपेना. अर्थात् मला अभ्यासच नकोसा वाटूं लागला. अभ्यासाविषयींची माझ्या मनांत उत्पन्न झालेली अढी पुढं अशीच वाढत गेली असती तर मी मॅट्रिक होणं शक्यच नव्हतं पण इंग्रजी चवथीच्या परीक्षेंत गणित विषयांत मिळालेल्या त्या शून्य मार्कानं माझी महत्त्वाकांक्षा चांगलीच जागृत केली; आणि इंग्रजी पांचवी-पासून मी सावरलों.

पुण्यास येईपर्यंत मीं वर्तमानपत्र कधीं पाहिलं नव्हतं. 'केसरी'चा अंक जेव्हां प्रथम माझ्या हातीं पडला तेव्हां मीं अग्रलेखाची पहिली ओळ वाचायला जी सुरवात केली ती आडव्या दिशेनं सगळे कॉलम ओलांडून जाऊन सरळ वाचून टाकली. कांहींच अर्थबोध होईना तेव्हां माझ्या वडिलांना मीं विचारलं, आणि वर्तमानपत्राच्या उभ्या कॉलमांचा अर्थ त्या वेळीं प्रथम मला कळला.

आमच्या घरीं वर्तमानपत्रं अगर मासिकं विशेष घेत नसत. पण माझे आजोबा (आईचे मामा) 'करमणूक', 'मनोरंजन' इत्यादींचे वर्गणीदार होते. त्यांच्या घरीं जाऊन मी तासन् तास वाचीत बसत असें. 'करमणुकी'चा अंक यायला उशीर झाला —आणि तसा तो वारंवार व्हायचाच— कीं मला अगदीं चैन पडत नसे. कारण त्यांत चालू असलेल्या कादंबरीचीं पुढचीं प्रकरणं केव्हां एकदां वाचायला मिळतील अशी मनाला अगदीं विलक्षण ओढ लागलेली असायची.

मात्र वाचनाची विशेष गोडी जरी मला त्या वयांत लागली होती तरी आपण लेखक व्हावं अशी पुसटसुद्धां कल्पना त्या वेळीं माझ्या मनांत कधीं आली नाहीं. त्याऐवजीं भलतीच एक कल्पना माझ्या मनांत दृढमूल होऊं लागली होती. ती म्हणजे आपण नाटकांत जावं आणि नट म्हणून कीर्ति मिळवावी !

त्या वेळीं खाडिलकरांचीं 'कांचनगडची मोहना', 'कीचकवध' इत्यादि नाटकं खूप गाजलीं होतीं. त्यांचे एक दोन प्रयोग चार आण्याचं तिकीट काढून तिसऱ्या मजल्यावर मीं पाहिले,

अन् मला रंगभूमीचं विलक्षण आकर्षण वाटूं लागलं. नाटकांतलीं कित्येक भाषणं घरीं पाठ करून साभिनय म्हणण्याचा मीं सपाटा चालू केला. इतकंच नव्हे तर 'महाराष्ट्र नाटक मंडळी'च्या मालकांना 'मला तुमच्या कंपनींत यायचं आहे' असं पत्रसुद्धां लिहून टाकलं. त्यांनीं रुकार कळविला असता तर घरांतून पळून जाण्याची सर्व तयारी मीं करून ठेवली होती. पण असेल कोणा मूर्ख नादिष्ट पोराचं पत्र म्हणून त्यांनीं माझं तें पत्र फाडून टाकलं असावं ! त्यांच्याकडून कांहीं उत्तरच आलं नाहीं, आणि त्यांना समक्ष जाऊन भेटायचं धैर्य मला कधीं झालं नाहीं. त्यांची भेट घेण्याच्या हेतूनं शनिवारवाड्यासमोरच्या कंपनीच्या बिऱ्हाडाच्या जागेपर्यंत मी पुष्कळदां गेलों, पण दाराशीं पोंचतांच माझे हातपाय कांपूं लागत, आणि दर वेळीं मी तसाच परत येत असें. मग कांहीं दिवसांनीं नाटक कंपनींत जाण्याचं माझं वेड आपोआप नाहींसं झालं.

अशा प्रकारं माझं लहानपण मी आठवूं लागलों कीं माझ्या स्वभावांत जशा कित्येक चांगल्या तशाच कित्येक फार वाईटही गोष्टी होत्या असं माझ्या मनांत येतं. यामुळं आतां कितीही अवखळ मूल मला दिसलं तरी तें पुढं सुधारणार नाहीं किंवा मोठेपणा मिळविणार नाहीं असं मला वाटतच नाहीं. मुलांच्या अंतःप्रवृत्ति आणि योगायोग यांच्या क्रियाप्रतिक्रियांच्या योगानं त्यांच्या जीविताला वळण लागत असतं अशी माझी श्रद्धा बनलेली आहे !

['माझें लहानपण' : मुलांचें मासिक, नोव्हेंबर. १९३९]

## लहानपणची आणखी एक आठवण

फडताळांतल्या त्या पसाऱ्यांत एक कुत्र्याच्या गळ्यांत घालायचा धातूचा पट्टाही होता. माझी 'जाई' नांवाची एक लाडकी कुत्री होती तिचा तो होता. मीं बारा वर्षांचा होतों तेव्हां एका वैदूजवळून एका भाकरीवर विकत घेऊन मीं ती बाळगली होती. माझ्या आईबापांना किंवा घरांतल्या कोणाही वडील माणसांना ती आवडत नसे; पण माझ्या मतें ती फार गोजिरवाणी आणि हुशार होती. घरांतलीं माणसें तिला घाण समजत; पण मला ती अस्वच्छ कधींच वाटली नाहीं. मीं तिला अंगाखांद्यावर घेत असें, तिचे पटापट मुके घेत असें; आणि तिला पांघरुणांत घेतल्याशिवाय दूर निजणें माझ्या जिवावर येई. मी शाळेंतून परत येतांच शेपटी हालवून व माझ्या अंगावर उडया घेऊन ती आपला जीव कासावीस करी. एकदां गणिताच्या मास्तरांनीं मला छडी मारली होती, व छडीचा तो मला पहिलाच अनुभव असल्यानें घरीं आलों तों हातावर अजून तें दुःख आहेसें मला वाटत होतें, व मन तर त्या अपमानानें जळत होतें. पण घरीं येतांच जाईनें आपल्या भाबडया जिभेनें जेव्हां माझा तळहात अश्वासासारखा चाटला तेव्हां माझें मानसिक व शारीरिक शल्य पार नाहींसें झालें. जाईला दिल्याशिवाय मीं कधीं कांहीं खाल्लें नाहीं, कीं प्यायलों नाहीं व त्याबद्दल वडीलधाऱ्यांनीं रागाचीं कितीही बोलणीं केलीं तरी तीं मला अवघड वाटलीं नाहींत. पण जाई फार दिवस मला लाभली नाहीं. पहिल्याच खेपेस वीत

असतांना, तिला काय झालें कोणास ठाऊक, तिचें प्राणोत्क्रमण झालें. शेवटच्या क्षणीं तिनें पाण्याने भरलेल्या डोळयांनीं माझ्याकडे जी केविलवाणी दृष्टि टाकली ती मी जन्मोजन्मीं विसरणार नाहीं. तिचें शव नेलें तेव्हां मीं रडून आकान्त केला, व तिची एक आठवण म्हणून तिच्या गळ्यांतला पट्टा काढून ठेवला. आज तो पट्टा हातीं घेतांच या सार्‍या आठवणी माझ्या मनांत उचबळून आल्या आणि नवल असें, कीं त्या इमानी, मुक्या जनावराच्या त्या अखेरच्या शोकपूर्ण कटाक्षाची आठवणही मला सुखाचीच झाली; गतदुःखाच्या आठवणीपासून सुखाचाच अनुभव मिळतो हे कांहीं खोटें नव्हे.

[गुजगोष्टी : हरवली म्हणून सापडली. ११७-११८]

# कॉलेजमध्यें

## २

[फडके यांचा कॉलेजशीं संबंध, विद्यार्थी व प्राध्यापक या नात्यानीं आज फार वर्षांचा आहे. विद्यार्थिदशेंतील कालेजांतील आठवणी.]

चांदण्या रात्रीं तर फिरण्याची मिजास कांहीं औरच असते. दिवस संपला असल्यामुळें शिष्टाचाराचीं बंधनें शिथिल झालींशीं वाटतात, आणि फिरायला जाण्यासाठीं अमुक पोशाख असावा हा एरवीं मान्य करावा लागणारा नियम झुगारून देतां येतो. किंबहुना, अशा वेळीं व्यवस्थित कोट टोपी घालून फिरलें तर तें फिरणें कसलें असें वाटतें. पोशाखाचा अंशतः त्याग करण्याचें हें सौख्य स्त्रियांना उपभोगतां येत नाहीं हें त्यांचें केवढें दुर्भाग्य! हें दुर्भाग्य संपविण्यासाठीं तरी साडी चोळी पोलक्याच्या भरीला आणखी कोणत्या तरी वस्त्राचा स्त्रियांनीं आपल्या वेषभूषेंत अवश्य अंतर्भाव करावा. खरोखरच कोट टोपी टाकून देऊन आणि धोतराचा कांचा कसून नेसण्याऐवजीं सोगा पुढें लोळता टाकून निघाल्याखेरीज चांदण्यांत

भटकण्याची खरी मौज मिळत नाहीं. मीं कॉलेजांत होतों तेव्हां वसतिगृहापासून जवळ असलेल्या टेकडीवर भटकायला जाऊन अपरात्रीं एक एक दोन दोन वाजेपर्यंत आम्ही कितीदां तरी बसलों असूं ! त्या वेळीं गप्पागोष्टींना आणि हसण्याखिदळ-ण्याला ऊत येई. ज्यांना गातां येत असे तेही गात, आणि ज्यांना येत नसे तेही गात. कोणी नाटकांतील भाषणें खडया आवाजांत म्हणत. मी कधीं कधीं बांसरी वाजवीत असें, किंवा कधीं गप्पांत सामील होत असें. परंतु मला अगदीं मनापासून आवड वाटे ती टेकडीच्या त्या माथ्यावरच्या शिलातलावर खुशाल उताणें पडून आभाळांत तरंगणाऱ्या चंद्रबिंबाकडे टक लावून पाहण्याची ! तसें पडून राहिलें, कीं पृथ्वीवरच्या साऱ्या वस्तु दृष्टीआड होत, नभोमंडळांतल्या तुरळक तारका आणि सहस्र धारांनीं चंद्रिकेचा वर्षाव करणारा मध्यावरचा दीप्तिमान गोल यांखेरीज कांहींच दिसत नसे, आणि स्वर्ग व पृथ्वी यांतील अंतर एकदम नाहींसें झाल्याचा भास होई. कॉलेजांत जे विषय मी शिकलों ते सारे एक दोन वर्षांतच मीं पार विसरलों, पण चांदण्या अपरात्रीचा हा दिव्य आभास माझ्या स्मरणांत अजून ताजा आहे !

[गुजगोष्टी : सहल. १५२-५३]

पावसाच्या या अनिश्चितपणावरून आठवण झाली. पाऊस अनिश्चित असतो म्हणून किती गंमती होतात पहा. मी कॉले-जांत होतों तेव्हां क्रिकेटच्या मोठमोठ्या मॅचस भर पावसाळ्यांत असावयाच्या. एखादी सुंदर मॅच ठरलेली असावयाची, आणि

त्या दिवशीं सकाळीं उठून पाहावें तों वरुणानें भले मोठे मोठे जलकुंभ आकाशांत हारीनें मांडून ठेवलेले दिसावयाचे! छे, छे! हा चांडाळ पाऊस आजचा क्रीडामहोत्सव पार बिघडविणार अशी भीति वाटावयाची. मग मन सारखी प्रार्थना करीत सुटावयाचें कीं, वरुणदेवा! दोन दिवस जरा कृपा कर आणि मग काय दंगा उडवायचा असेल तो उडव. अरे, केवढी मोठी आजची मॅच आहे! आज नायडू, देवधर, विठ्ठल आपलीं आयुधें सरसावून येतील आणि पारशी गोलंदाजांच्या कुंदुकांचीं मस्तकें तडातड उडवतील तो समरप्रसंग जरा पाहूं दे आम्हांला. तुला कसा रे असा सुंदर खेळ पाहावयाचा अगदीं नाद नाहीं?

आणि काय आश्चर्य! एखादे वेळीं ही प्रार्थना मान्य व्हावयाची! खरोखरच आकाशांतल्या त्या अजस्र मेघांच्या सिंहासनावरून बसून वरुणदेव मोठ्या कौतुकानें जणुं काय आमची मॅच पहात बसायचा, आणि वृष्टि करायचें भानच त्याला उरायचें नाहीं!

[गुजगोष्टी : पाऊस १०७-१०८.]

कोणी कांहीं म्हणो, मला असें वाटतें खरें. माझ्या संग्रहीं मराठी हॅम्लेट नाटकाचें पुस्तक आहे. तें जेव्हां जेव्हां मी चाळूं लागतों तेव्हां तेव्हां किती तरी वर्षांचा कालखंड एकदम ओलांडून १९१२ सालच्या माझ्या जीविताचा मी पुन्हा अनुभव घेत आहेसें मला वाटतें. कॉलेजांत जातां येतां, गणपतराव जोशांच्या हॅम्लेट नाटकाच्या, भिंतीवर लागलेल्या जाहिराती पाहून चित्त उत्कंठेनें व्याकुळ झालेलें आहे, गणपतरावांचीं

आतां हीं अखेरचीं नाटकें असें लोकांनीं म्हटलेलें ऐकल्यानें व आपण अजून त्या असामान्य नटाला पाहिलाहि नाहीं हें मनांत आल्यानें ती उत्कंठा अनावर झाली आहे, वडील नाटकाला धाडतील कीं नाहीं अशा सभय शंकेनें छळ मांडला आहे, अखेर वडिलांची परवानगी काढून जेवण उरकून– नव्हे अर्धें पानांत टाकून— किर्लोस्कर थिएटरमधील आठ आणे दराच्या खेंचाखेंचींत आपण बसलों आहोंत, आणि नाटक सुरु होऊन पहिल्या कंटाळवाण्या प्रवेशानंतरच्या दरबारांत राजानें "चंद्रसेना, अजून ही तुझी मुखश्री खिन्न आणि म्लान कां बरं?" असें विचारतांच "नाहीं काका; मला खिन्न असण्याचं कांहींच कारण नाहीं! मी आनंदांत आहें!" हें वाक्य गणपतरावांनीं उच्चारलेलें ऐकतांच त्यांतल्या साऱ्या संमिश्र भावनांची विद्युल्लहरी रंगभूमीवरून निघून आपल्या सर्वांगांतून जात आहे असें वाटतें!

[गुजगोष्टी : जुनीं पुस्तकें. १४५

रेनॉल्डसची 'Soldier's Wife' ही कादंबरी आत केव्हांहि वाचूं लागलों तरी वाटतें, अपरात्र झाली, घरांतल सारीं माणसें निद्रावश झालीं आहेत, दिवा उशाशीं मोठा करू आपण अंथरुणावर पडलों आहोंत, आणि बाहेर धों धों मुसळ धार पाऊस पडत आहे!

असें किती सांगूं? माझ्या जवळच्या साऱ्याच जुन्या पुस्तकांची ही तऱ्हा आहे.

[गुजगोष्टी : जुनीं पुस्तकें. १४‘

# भा षा शै ली

## ३

[फडक्यांचें चटकन नजरेंत भरणारें वैशिष्ट्य म्हणजे त्यांची भाषाशैली.]

## स्वभावचित्रें : निवेदनपद्धति

**पंजाबराव सरंजामे—**

पंजाबराव सरंजामे हें नांव पुणें शहरांतल्या आजच्या तरुण पिढीला फारसं माहित नाहीं. पण पुण्यांतल्या एखाद्या पेन्शनराजवळ तें नांव काढतांच पंजाबरावांच्या दहावीस तरी आख्यायिका सांगितल्याखेरीज तो तुम्हांला सोडणार नाहीं. म्हातारीं माणसं एरवीं जरी फारशीं बोललीं नाहींत, तरी त्यांच्या काळांतल्या एखाद्या व्यक्तीची गोष्ट काढली, कीं त्यांच्या जिभेला एकदम गति मिळते. मग ती थांबवणंच मोठं कठिण असतं! त्या न्यायाला अनुसरून पुण्यांतल्या एखाद्या वृद्ध गृहस्थाजवळ पंजाबराव सरंज्याम्यांबद्दल तुम्हीं गोष्ट काढलीत,

कीं गृहस्थ आपल्या चष्म्यांतून तुमची चवकस मुद्रा न्याहाळून पाहील, हजामत केलेल्या मस्तकाला चिकटलेले पांढऱ्या शेंडीचे दोनचार केंस डाव्या हाताच्या बोटांनीं उचलल्यासारखे करील, आणि खाकरून तुम्हांला म्हणेल,

"पंजाबराव ना ? मोठी विचित्र असामी होऊन गेली ती ! साधा मॅट्रिक झालेला वकील होता, पण प्रॅक्टिस काय विचारतां ! टांग्यांची ही थाप असायची स्वारीच्या दारापुढं ! अन् मुलखाचा लहरी ! मनांत आलं तर घ्यायचा केस हातांत, नाहीं तर खुशाल कुळाचे कागद फेंकून देऊन दाराची वाट दखवयाचा. मग तें कूळ लक्षाधिपति असलं तरी त्याला पर्वा नसायची ! मात्र, केस हातांत घेतलीन् पंजाबरावानं, कीं माणसानं निश्चित असावं. काय वाटेल तें करून केस जिंकायचाच तो. बोलणारा असा फर्डा होता म्हणतां ! तुमचे जयकर आणि जिना कसले हो त्याच्यापुढं ! एकदां मुंबईचा तो प्रसिद्ध बॅरिस्टर— काय पहा त्याचं नांव— तो हो — बुटासुटांत असायचा अन् एका डोळ्याला चष्म्याचं भिंग लावून बोलायचा तो—– अगदीं डोळ्यांपुढं आहे शिंच्याचं नांव. पण आठवत नाहीं. न आठवूं द्या. सांगायची गोष्ट अशी, कीं तो फर्डा बॅरिस्टर मुंबईहून आला एका केससाठीं इथं पुण्याला. आला तो अशा तोऱ्यांत, कीं पुण्याचं कोर्ट काय खेडवळ, नुसत्या रुबाबांत केस जिंकून जाऊं आपण ! पण विरुद्ध बाजूला पंजाबराव होता. त्यानं अशी तारांबळ उडवली त्या बूटपाटलोणवाल्या बॅरिस्टराची कीं कांहीं विचारूं नका. केस

तर जिंकलीनच पंजाबरावानं, पण त्या बॅरिस्टरचा पारशी कारकून बाररूममध्यें कांहींसं उद्धटपणानें बोलला तेव्हां पंजाबरावानं काड्दिशी श्रीमुखांत लगावली त्याच्या! दिसायला तरी स्वारी कशी होती म्हणतां? नुसता राक्षस दिसे. साडेसहा फूट उंचीचं शरीर, लहानपणीं आखाड्यांत कुस्त्या मारून कमावलेली ताकद, अंगांत अंगरखा अन् डोक्याला भलं चक्री पागोटं, पेशवाई थाटाच्या गलमिशा, आणखी भव्य कपाळावर तीन बोटांनीं लावलेलं चंदनाचं गंध! साऱ्या पुण्याला दरारा असे पंजाबरावाचा. त्यावेळीं बळवंतराव टिळक नुकते पुढें यायला लागले होते. त्यांचीसुद्धां छाती नव्हती पंजाबरावाच्या मनाविरुद्ध जाऊन एखादं सार्वजनिक काम करायची. मवाळांची कॉंग्रेस पुण्यांत भरली तेव्हां मांडव कोणीं जाळून टाकला माहीत आहे? पंजाबरावानं! जबर इसम होऊन गेला बाबा! बुद्धि अचाट, दारूचं व्यसन केलन् तेंही अचाट, अन् अखेर अखेर राजकीय चळवळीसाठीं स्वार्थत्याग केलान् तोहि अचाट."

[प्रवासी : प्रकरण १ लें. १-२]

सय्यद अमीर—

'मात्र, मुंबईवाल्या साहेबा, आमच्या सय्यदविषयीं उगीच विचारून जाऊं नको हो! तो उनाड अन् छंदीफंदी आहे थोडा– कोण नसतं? जवानी आहे, चाललंच आहे! पण एरव्हीं तो गुणी आहे. या टापूंत त्याच्यासारखा निशाणबाज नाहीं. परवांच या मिऱ्या घाटांतल्या खोऱ्यांतच एक सपाट्या वाघ दोनशे यार्डांवरून टिपलान् कीं! नऊ फूट लांबीचं मोकळं

जनावर म्हणजे जेवण नाहीं ! त्याचं नुसतं निर्जीव कातडं पाहिलं तर डर वाटते आहे बघणाराला ! जाऊन बघ ना तूं. उमरखानाच्या बंगल्यांत व्हरांडयांतच टाकून ठेवलं आहे. सय्यदनं गंमतीनं त्यांना दिलं तें. देणं साहजिकच नाहीं का ? त्यांचा तो जांवईच व्हावयाचा आहे लवकरच ! छान सोयरिक होईल ! मोत्यांच्या व्यापारांतले दोन राजे एकत्र होणार म्हणा ना ! सय्यद अमीर आहे अन् आज शेंपन्नास पडावांचा मालक आहे तर उमरखान दौलतीनं सवाई अमीर आहे. इथं या बंदरांतच नव्हे तर कारवार, कोचीन, चार पांच बंदरांत त्याच्या शेंपन्नास पडावांचे ताफे तरंगताहेत !– धेनुकुंजचं सारं वेंचक मोतीं आज त्याच्या अलवाणांत आहे म्हणा ना !– बडी जंगी होणार शादी ! आम्हां गांवच्या लोकांना मोठमोठ्या दावती होतील, इथली ब्रँको नाहीं तर अस्सल विलायती दारू खायला मिळेल !– वारे सय्यद !– तुला सांगू ? सय्यद म्हणजे शराब आहे बघा. हवासा वाटतो. पण जवळ न करणं बरं ! नकोसा वाटतो पण दूर करवत नाहीं ! आलं ध्यानांत ? हू ऽ ऽ ऽ प् ! वाः !– या खुदा !– अरे भाई, गाडी उभी कर बाबा. मला इथं पिराच्या वाडीवरच उतरायचं आहे ना ! हां– तेवढं तें अंडयांचं टोपलं इकडे करा मियाजी. बहोत अच्छा ! मुंबईवाल्या साहेबा, आदाब अर्ज, बंदगी !"

[अटकेपार. ६६]

[खालील उतारा संभाषणपद्धतीनें केलेल्या स्वभावरेखनाचा एक नमुना असून, फडके कादंबरीची सुरवात किती आकर्षकतेनें करतात हें दर्शवितो.]

# दौलत

## प्रकरण पहिलें

## निर्मला

भायखळा स्टेशन येण्यापूर्वींपासूनच निर्मलेच्या मैत्रिणी आपापलें सामान आवरूं लागल्या. त्यांची ती निष्कारण धांदल पाहून निर्मला हंसत म्हणाली, "उगीच काय ग अशी धांदल करतां? आपल्याला उतरायचं आहे बोरीबंदरवर. अजून भायखळ्यालासुद्धां ठिकाण नाहीं. अन् सामान तें काय असं आवरायचं आहे? वाचायला म्हणून काढलेलं हातातलं पुस्तक ट्रंकेमध्यें टाकायचं अन् बांकाखालीं पडलेल्या चपला पायांत घालायच्या येवढंच ना? भारी बाई उतावळेपणा करतां! ही कमळ तर कांहीं विचारायला नको!"

कमळ आपल्या बांकाखालीं ट्रंकेशीं कांहीं तरी झटपट करण्यांत गुंतली होती. डोकें वर न करतां ती म्हणाली, "माहीत आहेस विचारवंत शांत आजीबाई आहेस ती! माझ्यासारखी अशी ट्रंकेच्या कुलुपांत किल्ली अडकून बसली म्हणजे समजेल."

एकीकडे असें म्हणत तिनें ट्रंक उघडण्याचा प्रयत्न चालविला होता. शेवटीं ती अर्धवट आपल्याशीं रागानें म्हणाली,

"तरी मी तात्यांना सांगत होतें, कीं ही ट्रंक मला नको. हिच्या कुलुपाचं मेल्याचं अस्सं ठरलेलं आहे नेहमींचं !"

तिचें तें चरफडणें पाहून व बोलणें ऐकून सगळ्याजणी हंसल्या. कमळ काकुळतीनें म्हणाली, "इश्श ! हंसतां ग काय ? निर्मले, बघ ग तुला उघडतं आहे का हें खट्याळ कुलुप. आणखी ही मली किल्ली कशी गच्च बसली कोणास ठाऊक !"

"तुझी घाईच त्याला कारण." असें म्हणत निर्मला उठली व कमळेला म्हणाली, "आतां तूं बाजूला हो पाहूं. पाहतें मी मला उघडतां आलं तर."

उठतां उठतां कमळ म्हणाली, "कसचं उघडतं आहे ! माझ्यामागं त्रास पाहिजे ना कांहींतरी ! आतां मुंबईस पोंचलें, कीं आधीं ट्रंक उघडून घ्यायच्या खटपटीस लागलं पाहिजे, नाहींतर मेल्या त्या कुलुपावर एक दगड घालून त्याची दांतखीळ काढली पाहिजे. त्याशिवाय कसला अभ्यास ! अन् परवां पहिलाच पेपर इंग्लिशचा ! किती वाचायचं आहे ! जीव कसा त्रासून जातो असं कांहीं भलतंच—"

कमळेचा घायकुता स्वभाव व्यक्त करणारें तिचें तें रडवें भाषण ऐकून तिच्या सर्व मैत्रिणी हंसल्या, आणि त्या हंसण्याची लाट विरत येतें न येते तोंच निर्मलेनें अलगद हातानें किल्ली फिरवितांच ट्रंकेचें कुलूप निघाल्यामुळें ती लाट दुप्पट जोरानें उसळली.

त्या तरुण मुलींचें बोलणें चालणें पांच मिनिटें ऐकल्याबरोबर त्या सर्वजणी बी.ए.च्या परीक्षेसाठीं मुंबईस चालल्या होत्या हें कोणासही कळण्यासाखें होतें. परीक्षेला नेमलेल्या

निरनिराळ्या विषयांसंबंधीं मतें, परीक्षांसंबंधीं ऐकीव बातम्या, परीक्षेंत येणाऱ्या प्रश्नांविषयीं तर्क, कॉलेजांतील निरनिराळ्या प्रोफेसरांविषयीं शेरे आणि मधून मधून एकमेकींची थट्टामस्करी यांतच हंसत खेळत पुण्याहून निघाल्यापासून त्या मुलींनीं वेळ काढला होता. त्या बायकांच्या डब्यांत बसल्या होत्या म्हणून; नाहींतर त्यांचीं बोलणीं एखाद्या पुरुषाच्या कानीं पडतीं—तशीं तीं पडावींत म्हणून कितीतरी पुरुषांना अतृप्त उत्कंठा लागलेली असेल—तर कॉलेजांतल्या मुलांइतक्याच मुलीदेखील आपआपसांत बोलतांना साऱ्या विषयांचा समाचार घेतात अशी त्याची खात्री झाली असती, आणि चार समवयस्क मुली एकत्र जमल्या, कीं हंसण्याच्या लहरींवर लहरी उठावयास तर कांहींच कारण लागत नाहीं असें त्याला आढळून आलें असतें. मुलाला फुलाची उपमा देणें हा जवळ जवळ आधुनिक कविसंकेतच ठरलेला आहे, तसाच तरुण मुलींना हास्यलहरींची उपमा देणें हाही दुसरा कविसंकेत ठरावयास हरकत नाहीं.

कमळ घायकुती होती, पण चिडखोर नव्हती. निर्मलेनें शांतपणें कुलूप उघडून तिची जी फजिती केली ती पाहून इतरांप्रमाणेंच तीही मनापासून हंसली. आणि त्या हंसण्याच्या भरांत उघडलेल्या ट्रंकेमध्यें पुस्तकें ठेवण्याचें भान तिला राहिलें नाहीं. शेवटीं भायखळा स्टेशनमध्यें गाडी खाड् खाड् आवाज करीत शिरूं लागली तेव्हां दचकून "अगबाई ! मी आपली हंसतच बसलें !" असें म्हणून तिनें घाईघाईनें आपलीं पुस्तकें ट्रंकेमध्यें टाकण्यास सुरवात केली.

निर्मलाही उठून आपलीं पुस्तकें सूटकेसमध्यें व बसावयास काढलेली चादर व उशी वळकटींत ठेवूं लागली.

तें पाहून कमळा म्हणाली, "अहो बाईसाहेब, अजून सुद्धां बोरीबंदर यायला पक्कीं दहा मिनिट आहेत बरं का! मग कां करते आहेस घाई? लोकां सांगे ब्रह्मज्ञाऽऽन!"

असा शेवटीं हेल काढून कमळा मोठ्यांदा हंसली. निर्मलेला तिच्या त्या टीकेचें मर्म पटलें. एकीकडे वळकटीचा कातडी पट्टा आंवळीत ती म्हणाली, "मी सुद्धां घाईच करतें आहें. खोटं नाहीं. मला वाटतं हा स्वभावधर्मच आहे. अपेक्षित गोष्ट जवळ आली, कीं माणसाची उत्कंठा अधिकच अनावर होते."

तिच्या या सामान्य सिद्धान्ताकडे कमळेचें विशेष लक्ष न्हतेंसें दिसलें. आपली ट्रंक कायमची बंद करून सरळ सरकवीत तिनें विचारलें, "निर्मले, तूं उतरणार आहेस कुठं ग?"

निर्मलेनें उत्तर देण्यापूर्वींच तारा नांवाची एक मुलगी म्हणाली, "अग, तिचं काय विचारतेस? मोठ्या वकीलसाहेबांची लेक आहे ती. मुंबईचे सारे अग्रगण्य बॅरिस्टर अन् ॲडव्होकेट भय्यासाहेबांच्या दोस्तींतले असायचे! अशांतल्याच कोणाकडे तरी ती उतरायची असणार!"

तारेनें आरंभिलेल्या कोटीची जणुं कांहीं समस्या पुरी करण्यासाठींच कमळा हंसत म्हणाली, "अगदीं जस्टिस मनुभाई शहांच्या पेडर रोडवरील बंगल्यावरच ही उतरणार आहे म्हणेनास!"

निर्मला शांतपणें हंसत म्हणाली, "कमळे, तूं चेष्टेनं म्हणून

म्हणालीस, पण भय्यासाहेब मला खरंच जस्टिस शहांच्याकडे उतरण्याचा आग्रह करीत होते."

"करीत होते म्हणजे? तूं त्यांचं ऐकलं नाहींस वाटतं? तुझे वडील जसे सुधारकांचे पुढारी तसेच मुत्सद्दीही आहेत. जस्टिस शहांचा एखादा मुलगा उपवधू असेल तेव्हां तूं चार दिवस त्यांच्या घरांत राहिलीस कीं श्रीमंत जांवई पदरांत पडायला हरकत नाहीं असा त्यांचा हिशेब–"

"कमळे, वहावत चाललीस हो तूं!" अशा सौम्य दटावणीनें निर्मलेनें तिला गप्प केलें.

तारेनें विचारलें, "बरं तें असो. मग तूं उतरणार आहेस कठं?"

"आमच्या भय्यासाहेबांचे एक लहानपणचे स्नेही आहेत माधवराव आपटे म्हणून. कस्टम खात्यांत नोकर आहेत. त्यांचं अगदीं आग्रहाचं पत्रं आलं भय्यासाहेबांना कीं, निमाताईला माझ्याकडेच उतरायला पाठवा. तेव्हां मीं भय्यासाहेबांना म्हटलं, कीं मी त्यांच्याचकडे उतरतें. माझं म्हणणं त्यांना पसंत पडलं नाहीं. स्वतःच्या इच्छेविरुद्धच त्यांनीं सम्मति दिली. पण मींही पडत्या फळाची आज्ञा ध्यायचं मनाशीं ठरवलं होतं. अग कुठें जा श्रीमंत लोकांकडे उतरायला?"

"पण तूं श्रीमंतांच्याच वर्गांतील आहेस ना!"

"नसतें तर बरं झालं असतं असं मला पुष्कळदां वाटतं."

[दौलत : प्रकरण १ लें. १-४]

राजाभाऊ व पंजाबराव सरंजामे—

ते गेल्यावर पंजाबरावांनीं नोकराला हांक मारली, व राजाभाऊला बोलवायला त्याला सांगितलें.

राजा येतांच पंजाबरावांनीं विचारलें,

"काय रे, तुझा अभ्यास कसा काय चाललाय ?"

"चांगला नाहीं चाललेला !"

राजाच्या त्या उत्तरानें पंजाबराव थोडेसे चकित झाले. तो असें सरळ, स्पष्ट, खरें उत्तर देईल अशी त्यांची कल्पना नव्हती. त्यांनीं पुढें विचारलें,

"कां नाहीं चांगला चालला अभ्यास ?"

"माझ्याच्यानं होत नाहीं."

"कां ?"

"माझं लक्ष लागत नाहीं."

"परीक्षांत सारखा नापास होतो आहेस !"

"हो"

"मग तुझा बेत काय आहे ?"

"मला गाणं शिकायच आहे."

तें त्याचें उत्तर ऐकतांच पंजाबराव एकदम संतापले, व ओरडले, "गाणं शिकायचं आहे ? कांहीं शरम वाटत नाहीं तुला ? तुझा अभ्यास सुरळीत चालला असेल, पुढच्या वर्षी तूं मॅट्रिक होशील, चार वर्षांत कॉलेजचं शिक्षण संपवशील, मग मी तुला विलायतेस धाडीन असे मी मनाशीं बेत करतों आहें, आणखी तूं सहाव्या इयत्तेंतच नापास होणार ? वाटत

नाहीं तुला काहीं ! तूं कुणाचा मुलगा, तुझा सामाजिक दर्जा काय, आपल्या कुळाची इभ्रत काय, हें सगळं विसरलास वाटतं ? पंजाबराव सरंजाम्यांचा मुलगा नाटक्या अन् गाणारा निघाला, असं लोकांनीं म्हटलं तर मोठं भूषण वाटेल नाहीं तुला ?"

"दूषण कांहीं वाटणार नाहीं !"

राजाच्या त्या धीट व स्पष्ट उत्तरानें पंजाबराव चांगलेच चमकले त्यांनीं त्याच्याकडे निरखून पाहिलें.

त्याच्या वयाच्या मानानें तो चांगला उंच दिसत होता, हाडापेरानें दांडगा होणार असेंही दिसत होतें. बापाची शरीरसंपत्ति त्याच्यांत उतरली होती. बापाची निर्भयता आणखी बेदरकारपणाही त्याच्या ठिकाणीं आला होता काय ? त्याचा चेहरा मोठा रेखीव दिसत होता. आईचें सौंदर्य त्याच्या वांट्याला आलेलें होतें. अगदीं थेट तिच्यासारखेच त्याचे नाकडोळे आतां स्पष्ट दिसूं लागले होते. त्याचे ते ओंठ तर अगदीं तिचेच ओंठ होते.

पण या विचारांना पंजाबरावांनीं अधिक सवड दिली नाहीं. आपल्या संतापाची ऊर्मि कमी होऊं देण्याची त्यांची इच्छा नव्हती. त्यांनीं ओरडून विचारलें,

"काय म्हणलास ? दूषण वाटणार नाहीं ?"

"नाहीं !"

"कारण ?"

"कारण गाण्यावर माझं विलक्षण प्रेम आहे ! अन् त्यांत मी

नांव मिळवीन असं मला वाटतं. गाणं ही तरी एक विद्याच आहे. त्यांत मी नांव मिळवलं तर लोकांनीं मला नावं कां ठेवावीं ?"

हा प्रश्न बिनतोड होता, आणि त्यामुळें पंजाबराव अधिकच संतापले. मग त्यांनीं अतिशय कठोर बोलण्यास प्रारंभ केला. चारपांच मिनिटें ते सारखे उच्च स्वरानें बोलत राहिले. शेवटीं ते म्हणाले,

"मला तुझा हा गाण्याचा नाद बिलकूल पसंत नाहीं. तो मीं ताबडतोब बंद करायचा म्हटला तर मला करतां येणार नाहीं असं का तूं समजतोस ?"

"तुम्ही माझे वडील आहांत तेव्हां करतां येईल तुम्हांला. पण, तुम्हीं तसं केलंत तर माझे प्राणच तुम्हीं घेतलेत असं मला वाटेल ! मला मनस्वी दुःख होईल !"

"म्हणजे मॅट्रिकच्या परीक्षेचा तुझा मुळीं विचारच नाहीं, असं होय ?"

"मी पास होणं शक्य नाहीं, अन् म्हणून मी तिचा विचारच करीत नाहीं."

हें सांगतांना राजानें आपली नजर खालीं जमिनीकडे केली. त्याच्या स्वरांतली मघांची निर्भयता या शब्दांत नव्हती. परीक्षा पास होणें आपल्याला अशक्य वाटतें हें कबूल करतांना त्याला मोठासा अभिमान वाटत नव्हता असें दिसलें.

पंजाबरावांनीं क्षणभर त्याच्याकडे टक लावून पाहिलें. साक्षीदाराची उलटतपासणी करण्यांत आयुष्य घालविलेल्या त्यांच्यासारख्या वकिलाला दुसऱ्याच्या मनांतल्या बदलत्या विचार-

छटा ओळखून आपलें बोलणें कसें बदलावें ही विद्या पूर्ण हस्तगत झालेली असते.

ते म्हणाले,

"राजा, हें तूं काय बोलतोस? अरे, य:कश्चित् मॅट्रिकच्या परीक्षेची तुला भीति वाटते? ती पास होणं शक्य नाहीं म्हणून तूं खुशाल कबूल करतोस? अरे किती अडचणींतून मार्ग काढून अन् परिस्थितीशीं कसं कसं झगडून मीं विद्या केली हें तुला माहीत नाहीं? माझीच गोष्ट कशाला? आजही तुझ्याच वर्गांत अशीं दोन चार मुलं खचित असतील, कीं जीं माधुकरीच्या चतकोर भाकरीवर आपली भूक कशीबशी भागवीत असतील, रात्रीं अभ्यास करतां यावा म्हणून दिव्यासाठीं लागणाऱ्या तेलाची कुणाजवळ तरी भीक मागत असतील, अन् विद्या करीत असतील. मॅट्रिक झालं कीं स्वर्ग हातीं येईल असं मलाही वाटत नाहीं. उलट ही परीक्षा म्हणजे पोरखेळ आहे अशीच माझी समजूत आहे. पण म्हणूनच तुझ्यासारख्या मुलाला ती परीक्षा म्हणजे केवळ हातचा मळ वाटला पाहिजे असं मी म्हणतों. तुला काय कमी आहे? पैसा आहे, सुखसोयी आहेत, अभ्यासासाठीं जें जें मागशील तें तें द्यायला मी तयार आहें, अन् असं असूनही तूं आपल्या मनाला खुशाल कच खाऊं देतोस? गाणं ही एक विद्या आहे, आणखी ती प्राप्त करून घेण्याचा हव्यास तुझ्यासारख्या मुलानं धरावा किंवा नाहीं, तसं करण्यांत कांहीं बहादुरी आहे कीं नाही हा प्रश्नच आपण सध्यां सोडून देऊं या. त्यांत बहादुरी असेल

किंवा नसेल. पण, खुळ्यासारख्या यःकश्चित् परीक्षेला भिऊन तूं पळ काढावास यांत मात्र बहादुरी खचित नाहीं. हा भेकड-पणा आहे. माझा मुलगा कसाहि निघो, पण माझ्या दृष्टीनं तो भेकड निघाला तर मला मरणप्राय दुःख होईल. तुला आवाजाची निसर्गदत्त देणगी असेल, गाण्याची आवड तुझ्या अंगीं असेल, तर त्या गोष्टींचा तूं उपयोग करूं नकोस असं नाहीं मी म्हणत. पण आपल्या अंगच्या गुणांचा विकास कर-तांना माणसानं तारतम्य सोडतां कामा नये. भेकडपणा तर कधींच पदरीं घेतां कामा नये. पंजाबरावाच्या मुलाला शाळें-तली एक परीक्षासुद्धां देतां आली नाहीं असं जगाला म्हणूं दे काय ? अन् तें ऐकण्याचं दुःख माझ्यासारख्या मानी माणसाला सोसवेल असं तुला वाटतं काय ? अगदींच असा तू भेकड झालास ? तुझ्या अंगीं महत्त्वकांक्षा नाहीं ? बाणेदारपणा नाहीं ? पीळ नाहीं ? – ''

बापाचें हें सारें बोलणें ऐकतांना राजाच्या मनाची काय काय चलबिचल होत चालली होती कुणास ठाऊक ? तो एकदम वर मान करून म्हणाला, ''बाबा; मी तुम्हांला आश्वा-सन देतों, कीं मी मॅट्रिक पास होईन. आतां तर तुम्हीं निश्चित व्हाल ना ?''

दुसऱ्या वर्षी राजा मॅट्रिक परीक्षा पास झाला.

(प्रवासी : प्रकरण ४ थें ३३-३७.)

## यथार्थ उपमा

त्याच्या बोलण्यांत झालेला तो मीनाक्षीचा उल्लेख ऐकतांच

प्रयत्नानें शक्य तितके खालीं दडपलेले अनेक विचार एकदम पृष्ठभागावर येऊन सुधीरच्या मनाची अवस्था जरा विलक्षणच झाली. फुलझाडांच्या ताटव्यांत एखाद्या उधळलेल्या बैलाचें पाऊल पडतांच, तोंपर्यंत त्या ताटव्यांत असूनहि रंगसादृश्या-मुळें नजरेस न आलेलीं कितीक फुलपांखरें पंखांची मनोहर उघडझांक करीत उठलेलीं दिसावींत तसें त्याच्या मनाचें झालें. मीनाक्षीविषयींचे जे जे विचार मनावेगळे करायचा त्यानें प्रयत्न केला होता ते सारे म्हातान्याच्या एका वाक्यानें एकदम घोळका करून उठले.

[अटकेपार. १६१]

## अलङ्कारिक भाषा—

एक हंसण्याची लकेर त्याच्या कानीं आली !

ती ऐकतांच तो चकित झाला.

हंसण्याची लकेर नव्हे, स्वर्गसंगीताची ती तानच होतीसें त्याला भासलें. स्फटिकासारखी जलधारा पायऱ्यापायऱ्यांवरून उड्या घेत असतां तिच्या लाडिक नृत्याचाच जणूं ध्वनि निघाला. जणूं टपोरे मोती सरांतून ओघळून टप टप वाजले. कोवळें तारुण्य आणि रसाळ कंठमाधुरी यांच्या मिलाफाचे बुंदच जणूं मोहोळांतून मधाचे थेंब ठिबकावे तसे ठिबकले.

(अटकेपार : ७३)

## मार्मिक कोटी—

तिनें संमति दर्शवितांच अविनाशनें जरा अंतरावर असलेल्या एका नारळविक्याला मुंबईच्या विशिष्ट पद्धतीप्रमाणें 'श्' करून

हांक मारली. नारळविक्यानें वळून अविनाशकडे पहात 'नारि-ये ऽ ऽ ल,' असा शब्द केला. जणूं 'मी नारळविक्या आहें, मीच तुम्हांला पाहिजे आहें काय ?' असेंच त्या शब्दानें त्यानें विचारलें. अविनाशनें उलट नुसती मानेची खूण करतांच तो जवळ आला, व "दो अच्छे पानीवाले निकालो" असा अवि-नाशचा हुकूम ऐकतांच त्यानें आपल्या टोपलींतील तीन चार नारळ उचलून तपासून पाहिले, व विशेष बडें गिऱ्हाइक भेटल्यामुळें आपण त्यासाठीं अगदीं खास चांगला माल निवडून काढीत आहोंत असा बहाणा करून शेवटीं एक नारळ पसंत करून त्यानें डाव्या हातांत उभा धरला व उजव्या हातांतील सुऱ्यानें त्याच्या कोंवळ्या कवचाचीं शकलें उडवि-ण्यास प्रारंभ केला.

त्याच्याकडे पहात निर्मला म्हणाली, "आमचे परीक्षकही आतां आमची अशीच कत्तल करणार, नाहीं ?"

"हो. अन् या नारळांतल्या पाण्याप्रमाणं मधुर लिहिणं एखाद्या पेपरमध्यें त्यांना सांपडलं तर त्याचा आस्वाद घेण्या-इतका रसिकपणा त्यांनीं दाखविला तर नशीबच म्हणायचं!"

[दौलत : ३४]

## आकर्षक सुरवात

मी एकदम दचकलों अन् आरशांतल्या स्वतःच्या प्रतिबिंबा-कडे अगदीं टक लावून पहात राहिलों !

तो माझ्या दृष्टीस पडेल अशी माझी यत्किंचितही कल्पना

नव्हती. त्यामुळें तो दिसतांच मला अत्यंत आश्चर्य वाटलं. अर्थात् केव्हां ना केव्हां तरी तो मला दिसणार हें मी जाणून होतों. कारण, लवकर म्हणा अगर उशिरां म्हणा, प्रत्येकाच्या दृष्टीस तो पडत असतो. पण त्याचें आगमन आज होईल असें माझ्या ध्यानींमनींही नव्हतें. किंबहुना, मला तो आजपर्यंत कधींही दिसला नसल्यामुळें केव्हां तरी तो दिसणार ही गोष्ट मी अजिबात विसरून गेलों होतों या कारणानं तो दृष्टीस पडतांच मी चांगलाच चपापलों! भांबावूनसुद्धां गेलों!

तो कोण तें तुमच्या लक्षांत आलं ना?

डोक्यावरचा पहिला पांढरा केंस!

सकाळच्या प्रहरीं दाढी करीत होतों मी. उजव्या बाजूची दाढी संपली होती, आणखी डाव्या कानशिलापासल्या केंसांचा काट मारायसाठीं डाव्या आंगठ्यानं तिथले केंस सारखे करून उजव्या हातांतल्या वस्तऱ्याची धार त्या जागीं टेंकण्याच्या बेतांत होतों तोंच तिथल्या केंसांत एक पांढरा केंस मला दिसला.

मला प्रथम वाटलं, छे! पांढरा केंस असणं शक्य नाहीं. साबणाचा फेंस चिकटून राहिला असेल तिथं. म्हणून मी टॉवेलनं ती जागा चोळली अन् पुन्हां आरशांत पाहिलं. तों काय? होताच कीं तो पांढरा केंस तिथं! कांहींशा अधिकच उर्मटपणानं चमकत होता तो!

[नव्या गुजगोष्टी : पहिला पांढरा केंस : १२.]

## वर्णनाची बहार--

समुद्र अतिशय खवळलेला होता. वारा असा सोसाट्याचा

सुटला होता, कीं किनाऱ्यावर उभ्या असलेल्या स्त्रियांना आपले पदर व केंस सांवरतां सांवरतां पुरेवाट झाली होती; आणि त्यांच्या त्या संभ्रमाकडे पुरुषमंडळींच्या चोरट्या नजरा पुनः पुनः धांवत होत्या. समुद्राच्या उसळत्या लाटा धांवत येत त्या किनाऱ्याच्या फरशीवर हापटत तेव्हां मोठी गर्जना होई, आणि सफेत फेसाच्या मोत्यांचे सरच्या सर हवेंत उंच उडत! दूर क्षितिजापर्यंत दृष्टि फेंकली, कीं तांबूस, काळसर अशा पाण्याच्या प्रचंड प्रक्षोभाखेरीज दुसरें कांहीं दिसत नव्हतें. वर आभाळांत ढगांची गर्दी झाली होती आणि पावसाची मुसळधार केव्हां कोसळेल त्याचा नियम नव्हता. अशा वेळीं एक कोळ्याचा वीसपंचवीस वर्षांचा मुलगा एक लहानसा पडाव समुद्रांत लोटून मारे वल्हीं मारीत निघाला होता.

कांहीं वर्षांपूर्वीं पाहिलेलें हें दृश्य मी कधींही विसरणार नाहीं. त्या दृश्याची मला अनेक वेळां आठवण होते, आणि ती जेव्हां जेव्हां होते, तेव्हां तेव्हां मनांत असा विचार येतो, कीं मी चित्रकार असतों तर तें दृश्य चित्रफलकावर रंगवून ठेवलें असतें, आणि खालीं त्याचें नांव म्हणून लिहिलें असतें, "ऐन पंचविशी !"

[गुजगोष्टी : ऐनपंचविशी. ३१ ३२]

## कांहींतरी वेगळेंच !

खरंच, मला जर कोणीं विचारलं, 'अगदीं नमुनेदार सुटीची तुमची कल्पना काय आहे? कुठं जावंसं वाटतं तुम्हांला? अन् कसे दिवस घालवावे अशी तुमची इच्छा आहे?' तर मी उत्तर

देईन, कीं 'कुठं तें मी कांहीं सांगत नाहीं, कारण जिथं जावंसं वाटावं अशीं रम्य ठिकाणं असंख्य आहेत; पण जिथं जायचं तिथला मुक्काम कमालीचा सुखदायक करायचा असेल तर घड्याळ मुळींच बरोबर घेतां कामा नये अन् सुटीच्या ठिकाणीं गेल्यावर चुकूनसुद्धां घड्याळाची आठवण होतां कामा नये' एवढं मात्र मी खचित म्हणेन. वक्तशीर काम करून आलेला थकवा घालविण्यासाठीं सुटी घ्यायची अन् त्या वेळीं सुद्धां घड्याळयाच्या तंत्रानं सारे व्यवहार संभाळायचे, तर मग सुटी घ्यायची तरी कशाला ? एखाद्या बादशाही हॉटेलांत जायचं अन् बिल द्यायला खिशांतले पैसे पुरतील कीं नाहीं याची चिंता करीत पदार्थ बेतानं मागवायचे, असली दरिद्री चैन मला मुळींच पसंत नाहीं. बिलाबद्दल अगदीं बेफिकिरी ठेवतां येत असेल तरच मोठ्या हॉटेलांत माणसानं जावं. अन् तद्वतच स्थलकालाचीं आणि स्वतःच्या प्रतिष्ठेचीं सारीं बंधनं अजिबात झुगारून देतां येत असलां तरच माणसानं विश्रांतीदाखल मुशाफरी करावी.

* * *

मनुष्याला कोणत्या ना कोणत्या एका तरी गोष्टीची अशी वेडी आवड असायला पाहिजे, कीं जिच्या नादानं त्याला घड्याळाचा पूर्ण विसर पडेल. संगीत, चित्रकला, क्रिकेट, टेनिस-सारखा एखादा खेळ, पत्ते, गजीफा— कसलाहि कां होईना, मनुष्याला एक षोक असा असावा, कीं त्यामुळं त्याच्या आयुष्यांतला वक्तशीरपणा थोडा तरी नाहींसा होईल.

[मनोहर : धूम्रवलयें, सप्टें. ३९. घड्याळ]

पण म्हणून माणसानं पहाटे उठलं पाहिजे अन् त्यासाठीं लवकर निजलं पाहिजे असा आग्रह करण्यांत काय अर्थ आहे? कारण तसंच पाहिलं तर पहाटे उठणाऱ्याला ज्याप्रमाणं सृष्टीच्या एका सुंदर अवस्थेचा अनुभव घेतां येतो, त्याप्रमाणंच मध्यरात्र उलटून गेल्यावर निजणाऱ्या माणसालाही घेतां येतो. त्या वेळीं सृष्टीवर विलक्षण स्तब्धता पसरलेली असते. पक्ष्यांची किलबिल-देखील तिचा भंग करीत नाहीं. वारा कधीं स्वैरगतीनं तर कधीं मंद मंद वहात असतो. माझ्या घरासमोर एक लहानसा तलाव आहे. त्याला तर एखाद्या विचित्र आकर्षक गूढाचं स्वरूप त्या वेळेस आलेलं असतं. आणि वर आकाशांत तर शांति, गांभीर्य आणि सौंदर्य यांचा अपारमित विलास या क्षितिजापासून त्या क्षितिजापर्यंत ओसंडून चाललेला असतो. कधीं शुक्राची तेजः-पुंज चांदणी एखाद्या राणीप्रमाणें आकाशमार्गावर थबकून उभी असते, कधीं मंगळाचा संतप्त लाल तारा खालीं पृथ्वीकडे पहात असतो, कधीं मृगनक्षत्राचा चौकोन मोठ्या दिमाखानं निळ्या पार्श्वभूमीवर कलंडता मांडलेला असतो, अन् त्या मृगाचा पाठ-लाग करणारा व्याधाचा तारा खऱ्या शिकाऱ्याप्रमाणं अनावर अधीरतेनं चमचम करीत असतो. आकाशगंगेचा दुग्धरंगी पट्टा वांकडातिकडा पसरलेला असतो, आणि स्पर्धेनं आपापल्या कमी-अधिक तेजाच प्रदर्शन करणाऱ्या तारकांची तर जिकडे तिकडे नुसती खेंचाखेंच झालेली असते. तशांत अष्टमीचा चंद्र उगवतांना दिसला तर मग त्या देखाव्याच्या सौंदर्याला सीमाच उरत नाहीं.

[पहाटे उठण्याचा वेडेपणा : नव्या गुजगोष्टी, ४९-५०]

## टीकेचीं मूलभूत तत्त्वें व साहित्याचें महत्त्वमापन

नाट्यलेखनाच्या मूलभूत नियमांपैकीं एक नियम असा आहे, कीं नाटकांतील विविध प्रसंग एकमेकांतून विकसित झाल्यासारखे ज्या अंशानें दिसतील त्या अंशानें नाटक यशस्वी समजावें. प्रत्येक प्रसंग मागच्या प्रसंगांतून अपरिहार्य क्रमानें प्राप्त झालेला दिसला पाहिजे, आणि कोणताही प्रसंग कार्यकारणविहीन, अधांतरीं लावकळणारा असतां कामा नये, या नियमानुसार जितकी एखादी नाट्यकृति असेल तितकी तिची थोरवी अधिक गणली जाते. श्री. खाडिलकरांच्या आजपर्यंतच्या नाटकांचा सर्वांत प्रमुख गुण हा, कीं या नियमाची अंमलबजावणी त्यांच्या-कडून फार दक्षतेनें होते. नाट्यप्रयोगाच्या निरनिराळ्या अवयवांची सांखळी बिनतोड जुळविण्याची कला त्यांना चांगलीच साधली आहे. पौराणिक किंवा ऐतिहासिक कथानकाचा आपल्या चिकित्सक बुद्धीनें कांहींएक विशिष्ट अर्थ एकदां बसविल्यानंतर ते प्रयोगाची रचना अशा कौशल्यानें करतात, कीं नाटकाचा शेवट म्हणजे खरोखरीच प्रारंभींच्या प्रसंगांची अपरिहार्य परिणतिच होय असें प्रेक्षकास कबूल करावें लागतें. त्यांचें हें कौशल्य पहावयाचें असल्यास 'विद्याहरण' नाटकाकडे दृष्टि टाकावी. त्या नाटकाच्या शेवटच्या अंकांत शुक्राचार्यांचा जो पराजय व कचाचा जो विजय दाखविला आहे तो पूर्वींच्या घटनेचें फल आहे हें कबूल करणें भाग पडतें. खाडिलकरांच्या कौशल्याचा दाखला असल्यामुळें आमची अशी कल्पना होती, कीं मेनका नाटकांतही निरनिराळ्या प्रसंगांची ते अशी योजना करतील

कीं नाटकाचा शेवट सहजप्राप्तच वाटेल. तेव्हां या बाबतींत मेनका नाटक कसें काय वठलें आहे हें पाहणें क्रमप्राप्तच आहे.

[टाकीचे घाव : संगीत मेनका. ११९-१२०]

सारांश, खाडिलकरांची ही नवी नाट्यकृति कोणत्या दृष्टीनें यशस्वी झाली असें म्हणतां येईल हेंच कळत नाहीं. खाडिलकरांच्या नाट्यकौशल्याची सर्वांत महत्त्वाची बाजू ही, कीं पौराणिक कथानकाकडे साध्याभोळ्या दृष्टीनें न पाहतां तत्त्व-शोधक दृष्टीनें पहायचें आणि आपल्याला ज्या तत्त्वाचा विलास त्यांत दिसला तो सामान्य प्रेक्षकांनाही दिसेल अशा रीतीनें त्याची मांडणी करावयाची या कल्पकतेमुळेंच त्यांचीं कीचक-वधापासून तों स्वयंवरापर्यंत गद्य व संगीत नाटकें लोकप्रिय झालीं पण मेनका नाटकांत श्रीयुत खाडिलकरांच्या या विशिष्ट गुणाचा उत्कर्ष होण्याऐवजीं स्पष्ट अपकर्षच झाला आहे. खाडिकरांची सर्व नाट्यलेखनशक्ति ज्या गुणावर अधिष्ठित झालेली तो आधारच या नाटकांत समूळ नष्ट झाल्यामुळें त्यांत प्रशंस-नीय अशी दुसरी बाब शोधूं जातांही सांपडण्यासारखी नाहीं, यांत नवल नाहीं. या नाटकांत कुशल स्वभावरेखाटन नाहीं, मनोहर कथाविकास नाहीं, उच्च तत्त्वाचें प्रतिपादन नाहीं, चित्त प्रसन्न करणारे प्रसंग नाहींत, संभाषणांचे चटकदार ओघ नाहींत, उत्कृष्ट भाषाविलासाचीं स्थलें नाहींत आणि रम्य व शुद्ध विनोदाचा मागमूसही नाहीं. मात्र या गुणांच्या अभावाविषयीं आश्चर्य करण्याचें फारसें कारण नाहीं. या गुणांवर खाडिल-करांनीं कधीं भिस्त ठेवलेलीच नाहीं. या गोष्टी साधण्या-

विषयीं त्यांनीं केव्हांही मेहनत घेतलेली नाहीं. मूळ पौराणिक कथानक हवें तसें फिरवून त्याच्या विविध अंगभूत प्रसंगांची मांडणी बिनतोड तर्कशुद्ध पद्धतीनें आणि चालू राजकारणाचें प्रतिबिंब त्यांत प्रेक्षकांनाही सहजासहजीं दिसेल अशा रीतीनें करणें, या कलेचीच कमाई त्यांनीं प्रथमापासून मुख्यत: केली. आणि नाट्यकृतीचें हें अंग त्यांनीं नेहमीं अतिशय मेहनतीनें व कल्पकतेनें सजविल्यामुळें भाषावैभव, विनोद इत्यादि गोष्टींकडे त्यांनीं नेहमींच बेफिकिरीने दृष्टि टाकली. गडकऱ्यांची वैभवशाली, हृदयवेधक भाषा हीच जशी त्यांच्या नाट्यकृतींतील मुख्य शक्ति, त्या शक्तीच्या जोरावर जशी त्यांनीं इतर बाबतींची हयगय केली तरी चालली, तद्वत् पौराणिक साध्या कथानकाला नाविन्याचा, तर्कशुद्धतेचा आणि प्रस्तुत परिस्थितींत उद्बोधक ठरेल असा वेष चढविण्याची अजब हातोटी हीच खाडिलकरांच्या लेखनांतील मुख्य शक्ति पहिल्यापासू आहे, व त्या शक्तीच्या भरंवशावर इतर अवश्यक अशा गुणांकडे त्यांनीं केलेलें दुर्लक्ष खपत आलें आहे. परंतु मेनका नाटकांत या मुख्य शक्तीचाच प्रकाश नाहींसा झाल्यामुळें खाडिलकरांच्या लेखनांतील अवगुणांचें स्वरूप अधिकच भेसूर दिसतें. विश्वामित्र व मेनका यांना उंच चढविण्याच्या भलत्या आग्रहांत स्वत: कविच त्यांच्यासकट सपशेल खालीं पडले आहेत व 'विनायकं प्रकुर्वाणो रचयामास वानरम्!' अशी त्यांची स्थिति झाली आहे, असेंच प्रस्तुत नाटक वाचणारा किंवा पाहणारा प्रत्येक अभिज्ञ पुरुष अभिप्राय देईल, व त्यांच्या-

सारख्या अनुभवी व मान्य नाटयाचार्यानें इतकी हीन दर्ज्याची नाट्यकृति बिनदिक्कतपणें रंगभूमीवर आणावी याबद्दल महाराष्ट्रंगभूमीच्या प्रत्येक हितचिंतकास खेद व आश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाहीं.

(टांकीचे घाव; संगीत मेनका, १४९-१५०)

[भाषाशैलींतील लालित्याविषयीं स्वतः फडकेच एका ठिकाणीं म्हणतात.]

माझ्या भाषाशैलींत लालित्य आलें असलें तर तेंहि योगायोगानें, माझ्या व निरनिराळया कलावंतांच्या झालेल्या ओळखीमुळें व मैत्रीमुळें. त्यांपैकीं एकहि ओळख किंवा मैत्री मीं प्रयत्नानें संपादन केलेली नाहीं! त्या साऱ्या अकल्पित प्रसंगानें साधून आल्या. अर्थात् माझ्या स्वभावांत सौंदर्यप्रीति व भावनोत्कटता होती म्हणूनच ते स्नेह दृढ झाले हें कबूलच. परंतु त्या सर्वांचे आरंभ योगायोगानें झाले यांत संशय नाहीं.

माझी अशी समजूत आहे, कीं माझ्या भाषाशैलीचें बरेंचसें कारण माझी वक्तृत्वाची हौस होय. ही हौस माझ्या ठिकाणी केव्हां उद्भवली हें मात्र पक्कें आठवतें. १९१२ सालीं मीं इंटरमीजिएटच्या वर्गांत असतांना आमच्या फर्ग्युसन कॉलेजच्या संमेलनांत बॅ. जयकर यांचें व्याख्यान झालें. तें व्याख्यान मला नुसतें अत्यंत सुंदरच वाटलें नाहीं, तर त्याचा माझ्यावर त्याहूनहि अधिक खोल परिणाम झाला. वक्तृत्वाची जबरदस्त ईर्षा माझ्या ठिकाणीं उत्पन्न झाली इतकेंच नव्हे तर वक्तृत्वाची एक विवक्षित पद्धति संपादण्याचें मीं माझ्या मनाशीं ठरविलें. माझ्या

वक्तृत्वाच्या जोपासनेचा परिणाम होऊनच माझ्या लिहिण्याच्या भाषेला सध्यांचें वळण लागलें आहे.

[साहित्य आणि संसार : ११७-११८. माझ्या आयुष्याचा माझ्या लेखनावर परिणाम.]

कादंबरीचें सबंध कथानक एकाच गांवीं घडविण्यापेक्षां वेगवेगळ्या ठिकाणीं तें हालविलें म्हणजे वाचकाला कंटाळा येण्याचा संभव कमी असतो. चित्रपटांत वेगवेगळे 'अँगल्स' घेण्याचें जें महत्व आहे, तेंच महत्व कादंबरीच्या बाबतींत स्थलवैचित्र्याचें आहे. शिवाय असें, कीं कादंबरी वाचतां वाचतां निरनिराळ्या शहरांचीं वर्णनें वाचावयाला मिळालीं कीं वाचकास एक प्रकारें प्रवास केल्याचा आनंद होतो; व तीं तीं वर्णनें जर खरोखरीच चांगलीं साधलीं, तर वाचकाचें चित्त कथानकांत एरवींपेक्षां अधिक आनंदानें रमतें. 'अटकेपार' कादंबरी लिहिण्याच्या वेळेपासून स्थलवैचित्र्याचें हें महत्व मी मानूं लागलों, व त्याबद्दलचा बुद्धिपुरस्सर प्रयत्न करूं लागलों हें जरी खरें, तरी त्यापूर्वीं लिहिलेल्या 'कुलाब्याची दांडी' 'जादूगार' व 'दौलत' या तीन कादंबऱ्यांच्या वेळींहि कथानकाची रम्यता वाढविणारें हें साधन मीं अजाणतां वापरलें होतें असें आतां मला दिसून येतें. 'कुलाब्याच्या दांडी'त कथानक पुणें, मुंबई व अलाहाबाद अशा विविध ठिकाणीं हालत राहतें. इतकेंच नव्हे, तर 'अटकेपार'मधील धेनुकुंज बंदराप्रमाणें या कादंबरींत 'वृंदावन' नांवाचें शेतीबागायतीचें एक रम्य कल्पित मीं निर्माण केलें होतें. 'जादूगार'मध्येहि एकंदर

कथानकाचा ओघ दिल्ली, नागपूर, मुंबई, बिना अशा अनेक शहरांना वळसा घालीत पुढें सरकला आहे, आणि 'दौलत'-मध्येंहि मुंबई, सुरत, बनारस अशा निरनिराळ्या ठिकाणीं कथानकाचे धागे गुंतले गेले आहेत, इतकेंच नव्हे तर, ज्या-प्रमाणें 'अटकेपार'मध्यें पणजी व कोचीन या दोन खरोखरीच्या बंदरांच्या मधोमध धेनुकुंज नांवाचें काल्पनिक बंदर मीं योजिलें त्याचप्रमाणें 'दौलत'मध्येंहि जगन्नाथपुरी या खरोखरच्या तीर्थ-स्थलापासून नजीक शिवपट्टम् नांवाचें एक काल्पनिक ठिकाण मी घेतलें आहे.

[साहित्य आणि संसार : मी माझ्या कादंबऱ्या कशा लिहितों. १५३-१५४]

# खेळांची आवड

## ४

### ध्यानचंद

[फडक्यांच्या जीवनास विविध पैलू आहेत: संगीत, नृत्य, चित्रकला, खेळ इत्यादीविषयींची त्यांची आसक्ति त्यांच्या वाङ्मयांतहि प्रतिबिंबित होते.]

इंग्लंडमधील हे सामने झाल्यापासून सर्वांची खात्री होऊन चुकली, कीं ऑलिंपिक दंगलींत आतां हे हिंदी खेळाडू कोणाची डाळ शिजूं देणार नाहींत. इंग्लंडमधील एकंदर अकरा सामन्यांत हिंदी टीमवर सारे १८ गोल झाले होते व त्यांनीं लोकांवर ७२ म्हणजे चौपट गोल केले होते. हिंदी खेळाडूंची खेळण्याची तऱ्हा तिकडल्या लोकांना असामान्य वाटली. त्यांची चपळाई आणि काठीनें चेंडू ढकलीत नेण्याची त्वरा व सफाई पाहूनच ते थक्क झाले होते. या चपळाईवरून एका पत्रानें या हिंदी खेळाडूंना मांजराचे पाय आहेत असें म्हटलें होतें. हिंदी खेळाडू चेंडू घेऊन वाऱ्यासारखे धावूं लागले, कीं प्रतिपक्षी सर्वस्वीं हताश होऊन उभे राहत. प्रतिपक्षाच्या

गड्यांना हुलकावण्या देण्यांतील कसब, आपापसांत चटाचट चेंडू देत-घेत पुढें जाण्याचें चापल्य आणि हातांतील काठीनें चेंडू मारण्याच्या वेळची सफाई या हिंदी खेळाडूंच्या तऱ्हा तिकडील लोकांना अपूर्व वाटल्या, व या गुणांच्या जोरावरच हिंदी टीमनें सर्व टीम्सना चीत केलें. पुष्कळ वेळा असें होई, कीं हिंदी टीमवर चिडून युरोपियन खेळाडू त्रागा करून वाटेल तसे टोले लगावण्यास व हिंदी खेळाडूंना अंगाची धडक देण्यास प्रारंभ करीत. पण असल्या अस्त्रांचा हिंदी खेळाडू सहज लीलेनें बीमोड करीत, व त्यांची ती चतुराई पाहून प्रेक्षकांस त्यांचें अतिशय कौतुक वाटे. हिंदी टीममध्यें खेळाडूंची अदलाबदल प्रसंगानुसार होत असे. नेहमीं त्याच त्या अकरा जणांनीं खेळणें शक्य नसतें : एखादा खेळाडू आजारी असतो व मग त्याच्या जागीं दुसऱ्याची योजना करावी लागते; पण बहुतेक सर्व सामन्यांत खेळण्यांत सहा युरोपिअन्स, दोन मुसलमान व तीन हिंदु असत. हे सर्वच खेळाडू पटाईत होते; पण ध्यानचंद हा हिंदी खेळाडू म्हणजे केवळ टीमचा प्राण होता. हॉकीच्या खेळांत प्रत्येक पक्षाकडे अकरा खेळाडू असतात व त्यांपैकीं सहाजण आपल्यावर डाव होऊं नये अशा तऱ्हेनें बचावाचा खेळ व बाकीचे पांचजण प्रतिपक्षावर डाव करण्यासाठीं माऱ्याचा खेळ खेळत असतात. या पांचजणांच्या रांकेंत जो मध्यावर असतो त्याला 'सेंटर फॉर्वर्ड' असें म्हणतात, व ही जागा जबाबदारीची समजली जाते. ध्यानचंद हा सेंटर फॉर्वर्डच्या कामावर असे, व त्याचें क्रीडाचातुर्य पाहून लोक

विस्मयानें थक्क होत. हिंदी टीमची त्याच्यावर केवढी भिस्त होती तें पहावयाचें असल्यास पुढील आंकडे पहावे. इंग्लंड-मधील झालेल्या सामन्यांत हिंदी टीमनें जे एकंदर ७२ गोल केले त्यांपैकीं ध्यानचंदनें ३६ केले होते. कांहीं कांहीं सामन्यांत त्यानें डझनावारी गोल केले. त्याच्याकडे चेंडू येण्याचा अवकाश, कीं प्रतिपक्षाचे कितीहि लोक त्याच्यावर तुटून पडले तरी तो त्या सर्वांना सहज धाब्यावर बसवून सफाईनें मार्ग काढीत जाई व शेवटीं अशा कांहीं नेमानें टोला मारी, कीं चेंडू बंदुकीच्या गोळीप्रमाणें प्रतिपक्षाच्या गोलमध्यें गेलेला लोकांना दिसे ! त्याच्या चापल्यापुढें कोणाचाहि उपाय चालत नसे. बहुतेक प्रत्येक सामन्यांत प्रतिपक्षाचे लोक त्याला दाबून ठेवण्याचे हरप्रयत्न करीत; पण सर्वांच्या हातांवर तुरी देऊन चेंडू घेऊन तो केव्हां भरारी मारी त्याचा पत्ता लागत नसे. त्याच्या अजब चापल्यावरून व चेंडू घेऊन जाण्याच्या कौशल्यावरून त्याला लोक 'जादूगार ध्यानचंद' ... 'ध्यानचंद दी विझार्ड' असें म्हणूं लागले, व 'ध्यान' हें त्याचें लाडकें नांव लोकांच्या जिभेवर नाचूं लागलें. पूर्वीं क्रिकेटच्या खेळांत ज्याप्रमाणें 'रणजी'नें इंग्लंडला वेड लावलें होतें, त्याप्रमाणें हॉकीच्या खेळांत 'ध्यान'नें साऱ्या जगाला वेड लावलें.

इंग्लंडमधील सामने आटोपून हिंदी टीम हॉलंड, फ्रान्स, बेल्ज्यम, जर्मनी या देशांत हिंडली. या सफरींत एकंदर सात सामने झाले होते व ते सर्व हिंदी टीमनें जिंकले. या सात सामन्यांत मिळून हिंदी टीमवर सारे सहा गोल झाले, व तिनें

प्रतिक्षावर ६३ गोल केल. यांपैकीं २५ गोल 'ध्यान'नें केले! अशा प्रकारें आधींच दिग्विजय संपादून हिंदी टीम शेवटीं ऑलिंपिक् सामने खेळण्यासाठीं ॲमस्टरडॅम येथें दाखल झाली. हिंदी टीम सर्वांना मारणार अशी सर्वांची खात्री होऊन चुकली होती, आणि तेंच शेवटीं खरें झालें. ऑलिंपिक् अजिंक्यपत्रासाठीं हिंदी टीमला डेन्मार्क, बेल्ज्यम, ऑस्ट्रिया, स्वित्सरलंड व हॉलंड अशा पांच देशांशीं सामने खेळावे लागले. यांपैकीं एकाहि सामन्यांत हिंदी टीमवर एकदांहि गोल झाला नाहीं, आणि हिंदी टीमनें मात्र कमींत कमीं तीन व जास्तींत जास्त नऊ गोलांनीं प्रत्येक टीमचा पाडाव केला. हॉलंडशीं जो अखेरचा सामना झाला तो साहजिकच अत्यंत चुरशीचा झाला. हॉलंडचे खेळाडू विलक्षण निकरानें खेळले. हिंदी खेळाडूंची तऱ्हा त्यांनीं बऱ्याच अंशीं उचलली होती, आणि ध्यानचंदचा पक्का बंदोबस्त राखण्याची त्यांनीं शिकस्त केली, पण हिंदी खेळाडूंनींहि जिवापाड काम केलें. ध्यानचंदनें तर कमाल केली. प्रतिपक्षाचे कोटकिल्ले फोडीत धांव मारण्याचा त्यानें कळस करून दाखविला विद्युल्लतेसारखा तो क्रीडांगणावर चमकत होता, व चापल्याची शिकस्त करून त्यानें हॉलंडवर पहिला गोल चढविला. तेव्हां टाळ्याच्या गजराची जी लाट उठली ती हॉकीच्या इतिहासांत अजरामरच राहील. एकदां एक गोल चढविल्यावर 'ध्यान'ला आणखी स्फुरण चढलें व लवकरच त्यानें आणखी एक गोल केला. नंतर थोड्याच वेळांत हॉलंडवर तिसरा गोल झाला व सामना पुरा

होतांच यशस्वी झालेल्या हिंदी टीमच्या अभिनंदनार्थ जिकडून तिकडून हर्षध्वनीचा एकच कल्लोळ उठला. हिंदी टीमनें मिळविलेला हा त्रैलोक्यविजय अपूर्व होय. या विजयामुळें हिंदी राष्ट्राची इभ्रत हजारों पटींनीं वाढली आहे यांत संशय नाहीं. असा हा असामान्य पराक्रम गाजवून ता. २२ जून रोजीं परत येणाऱ्या हिंदी टीमचा आपल्यापैकीं प्रत्येकानें गौरव केला पाहिजे. कोणत्याहि राष्ट्राचा दर्जा काव्य, शास्त्र, राजकारण इत्यादि क्षेत्रांतील त्याच्या कामगिरीप्रमाणेंच त्याच्या क्रीडाक्षेत्रांतील नैपुण्यावरहि अवलंबून असतो. या दृष्टीनें आपल्या कालिदासाचें शाकुंतल जर्मन कवि गॉएट हा डोक्यावर घेऊन नाचल्याचें ऐकून आपणांस जो आनंद होतो तोच ध्यानचंदाला तिकडले खेळाडू डोक्यावर घेऊन नाचले हें ऐकून आपल्याला झाला पाहिजे.

[रत्नाकर, १९२८ : वनकिशोर या नांवानें.]

## धुलीपसिंग

परंतु इतरांपेक्षां धुलीपसिंग यांजकडे यंदा सर्वांचे डोळे अधिक लागून राहिले होते. त्यांची कीर्ति सर्वांच्या कानीं होती, व त्यांच्यांत विशेष काय आहे तें सर्वांना पाहावयाचें होतें. ते बॅटिंग कसें करतात येवढेंच नव्हे तर ते फील्डिंग कसें करतात, उभे कसे राहतात, कसे चालतात, किती बोलतात, केव्हां हंसतात, आऊट झाल्यावर परत कसे जातात— प्रत्येक गोष्ट लोकांना टिपून पाहावयाची होती, आणि

थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे ते लोकांना सर्वस्वीं प्रिय झाले. त्यांनीं स्लिप्‌मधील फील्डिंग शंभर नंबरी केलें. पहिल्या डावांत त्यांनीं दोन कॅच केले ते दोन्ही वाघानें टिपण साधावें अशा ऐटीनें केले. आपल्या जागीं ते सर्वदा उभे असलेले दिसत व इतर खेळाडूंशीं ते अतिशय गोडीनें वागत. दुर्बीणींतून पाहणारांस त्यांच्या तोंडावरचें हास्य कधींच लोपलेलें दिसलें नाहीं. क्रीडांगणावर ते इकडे तिकडे चालत तेहि मोठ्या रुबाबानें. ते उणेपुरे उंच आहेत, बांध्यानें मजबूत व प्रमाणशीर आहेत, वर्णानें गोरटे, नाकाडोळ्यांनीं नीटस आणि मुद्रेनें अत्यंत आकर्षक आहेत. धांवा काढावयाच्या वेळीं ते सशाच्या वेगानें धांवत असत; पण ज्या वेळीं टोला लांब गेला असेल व एकच धांव काढावयाची असेल त्या वेळीं दिवाणखान्यांत चालावें अशा सावकाशानें आणि रमत गमत चालत ते एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत जात. अर्थात् ते ही गोष्ट करीत ती स्वतःचा दम विनाकारण खर्च न व्हावा म्हणून. मागें टॅरंट या नांवाचा जो युरोपियन खेळाडू येथें खेळत असे तो असेंच करी. परंतु परवांच्या मॅचमध्यें धुलीपसिंग जेव्हां जेव्हां सावकाश चालून धांव पुरी करीत तेव्हां पारशी खेळाडूंना खिजवल्यासारखें प्रेक्षकांना वाटे व ते त्याबद्दल दर वेळीं टाळ्या वाजवीत. चोरट्या धांवा काढण्यांत धुलीपसिंग प्रवीण दिसले, व एकंदरींत धांव काढावयाची त्यांची नेहमींच तयारी असे. जोडीदार तयार असला, कीं त्यांच्याकडून कधींच ना नसे. त्यांच्या प्रत्येक कृतींत चलाख-

पणा भरलेला होता. त्यांच्या बॅटिंग्मध्यें देखील चलाखीचाच गुण प्रामुख्यानें दिसला. बोलरचा पडणारा चेंडू कसा पडत आहे याचा अदमास ते ताबडतोब करीत व त्यांची बॅट फिरे ती चलाखीनें आणि ऐटीनें. चाचरत, गडबडत असा त्यांचा टोला कधींच बसला नाहीं. आपल्या देवधर, नायडू अशा नामांकित खेळाडूंपेक्षां धुलीपसिंग यांच्या ठिकाणीं अधिक कांहीं दिसलें असलें तर त्यांच्या बॅटिंग्मधील कमालीचा सहजपणा. त्यांच्या जोडीनें खेळत असतांना जय यांनींहि आपली करामत कांहीं कमी दाखविली नाहीं हें वर लिहिलेंच आहे. पण धुलीप-इतकेच ज़य यांचे फटके जोरांत लागत हें जरी खरें, तरी धुलीप यांच्या खेळण्यांतील सफाई ( ईझ ) जय यांच्या खेळ-ण्यांत दिसली नाहीं. धुलीपशीं तुलना केली, कीं जय यांचे फटके ओबडधोबड वाटत. नामांकित चित्रकाराच्या हातांतला कुंचला किंवा निष्णात व्हायोलिन वाजविणाराच्या हातांतील गज हलावा तितक्या डौलानें व सफाईनें धुलीपसिंगाच्या हातां-तील बॅट हाले. आणि या सफाईप्रमाणेंच जेथें उघडी जागा दिसेल तेथेंच नेमका टोला देण्याची चतुराई ( प्लेसिंग ) त्यांच्या अंगीं विशेष दिसली. चिकाटीकडे ( स्टेडिनेस ) त्यांच्या मनाचा ओढा नाहीं. किंबहुना फार वेळ संथपणें खेळण्यांत बोलिंग्चा बडेजाव उगीच वाढवून ठेवण्यासारखें आहे, असें त्यांचें तत्त्व असल्यासारखें दिसलें. सणसणीत खेळण्याचा त्यांचा स्वभाव दिसला. पहिल्या डावांत त्यांनीं आल्यावर पहिल्या दोन तीन ओव्हर्समध्यें बोलिंग्चा अंदाज घेतला आणि

मग ताबडतोब मारावयास प्रारंभ केला. पारशी बोलिंग् यंदा विशेष जोरांत होतें हें वर एकदां सांगितलेंच आहे; परंतु जय यांच्या साहाय्यानें धुलीपसिंगांनीं त्या बोलिंग्ची नांगी सहज मोडली. भुंकणाऱ्या चावऱ्या कुत्र्याला लीलेनें पकडून त्याच्याभोवतीं गळपट्टा सरकवून आपल्याला हवें तसें हिंडवावें त्याप्रमाणें त्यांनीं पारशी बोलिंग्चें करून टाकिलें. जमशेटजी हा पारशी बोलर फार कठीण समजला जातो; पण त्याचे चेंडू तर धुलीपनीं पुढें येऊन ठोकले. जमशेटजीच्या बोलिंग्ची त्यांनीं अशी चिरफाड केली, कीं त्यानें पुन्हा सबंध मॅचमध्यें चेंडू हातीं घेतला नाहीं. चारी दिशांच्या बाउंडऱ्या त्यांनीं चेंडूला दाखविल्या. वुइकेटच्या कोणत्याहि बाजूस त्यांचे टोले सारख्याच सफाईनें जातात हें त्यांच्या बॅटिंग्मधील विशेष होय. त्यांचे चहुंबाजूंचे फटके ऐटबाज असतात. त्यांच्या ड्राइव्हचा फटका पाहिला म्हणजे तर एखादा पर्शियन तलम गालिचा उलगडत गेल्याचा भास होतो. आणि स्लिप्मधील फील्डर्स-मधून मारलेले त्यांचे 'लेग् कट'चे तडाखे तर आडतालाला वळसे घालून जाणाऱ्या गायकाच्या सुरेल तानेइतके गोड वाटतात. दुसऱ्या डावांत त्यांनीं एक ओव्हरबाउंडरी मारली ती सुद्धां सहजासहजीं उचलून! सारांश, त्यांच्या खेळांत शास्त्र व कला यांचा मोठा मनोहर मिलाफ झालेला आहे. आपल्या खेळानें व वागणुकीनें त्यांनीं मुंबईच्या प्रेक्षकांचीं मनें पूर्ण अंकित करून घेतलीं यांत संशय नाहीं व चौरंगी सामन्या-

साठीं ते पुन्हा हिंदूंना केव्हां लाभतील असेंच आज सर्वांचें मत आहे.

[रत्नाकर, १९२८ : वनकिशोर या नांवानें.]

## उदयशंकरचें नृत्य व फडके

ज्याला नृत्यांतल्या सौंदर्याची खरी दृष्टि आहे आणि संगीताचा सुरेलपणा ज्याच्या कानांना कळतो त्याला उदयशंकरचं कौतुक करावंसं मनांतसुद्धां यायचं नाहीं. पण अजिंठ्याच्या लेण्यांतल्या अष्टावक्र हातापायांच्या मूर्ति म्हणजेच हिंदी नृत्यकलेचें सारसर्वस्व अशी ज्यांची भ्रामक समजूत आहे त्यांना उदयशंकरचे नाच अजब वाटावेत हें साहजिक आहे. युरप-अमेरिकेंतल्या लोकांना बिचाऱ्यांना काय कल्पना, कीं अजंठा छापाच्या चित्रांहून भिन्न असं हिंदी नृत्यकलेचं स्वरूप पुष्कळ आहे, अन् तें गोंडस, बाळसेदार सुरेल आहे? रानटी ढोलांच्या तालावर आणि जेवायला बसल्यासारख्या मांड्या घालून बसलेल्या चार वाद्यकारांच्या रडक्या भेसूर सांथीनं उदयशंकरनं रंगभूमीवर थयथयाट करावा, त्याला 'तांडवनृत्य' असं नांव द्यावं, अन् युरोपियन अथवा अमेरिकन लोकांनीं कौतुकानं टाळ्या वाजवाव्यात हें सगळं योग्यच आहे. आणि ज्या अर्थीं युरप-अमेरिकेंत नांव मिळवून उदयशंकर आला त्या अर्थीं त्याची उदो उदो आपण केला नाहीं तर आपली मूर्खांत गणना होईल अशी भीति हीच ज्यांची रशिकपणाची शिदोरी त्यांनीं इथेंहि त्याच्या कार्यक्रमांना गर्दी करावी हेंहि सरळच

आहे. मला नका सांगूं उदयशंकरची प्रतिष्ठा. लालाजी, आपल्या मुलींच्या नाचांना उदयशंकरी घाट द्यावा असं आपल्याला पुन्हा कुणीं सुचविलं तर त्यांना आपण स्पष्ट सांगत चला, कीं उदयशंकरचे नाच किती गावठी होते हें लोकांना पटवायसाठीं माझ्या मुली अमेरिकेस जात आहेत.

[प्रवासी :२४६]

उदयशंकरचे नाच पाहून युरोप-अमेरिकेंतले लोक म्हणूं लागले, 'वा वा, किती विक्षिप्त अन् विचित्र आहे हिंदी लोकांची नृत्यकला, हिंदुस्थान म्हणजे एक मोठा विक्षिप्त देश आहे खरा!' हे उद्गार ऐकण्यांत उदयशंकरला धन्यता वाटली असेल. आम्हांला वाटायची नाहीं. हिंदुस्थान म्हणजे जिथं विषारी नाग आहेत, हिंस्र पशू आहेत, साधूबैरागी, राजयोगी, हठयोगी, गारोडी मांत्रिक आहेत, देवळाच्या विस्तीर्ण आवारांत अष्टौप्रहर पडून राहणारे लुळेपांगळे भिकारी आहेत असा जगाच्या पाठीवरचा सर्वांत विचित्र, विक्षिप्त देश, अशी बाहेरच्या राष्ट्रांची आधींच समजूत आहे. भोपळे, तारा, खुंट्या अशा सरंजामाचीं विचित्र वाद्यं दाखवून आणि आमच्या देवतांच्या वेड्यावांकड्या थयथयाटाचं प्रदर्शन करून त्या समजुतींत आम्हीं भर घालावी म्हणतां? तसं केल्यानं अलोट पैसा मिळण्यासारखा असला तरी तो नको आम्हांला. 'हिंदी लोकांच्या नृत्यगायनादि कला मोठ्या प्रगल्भ स्वरूपाच्या आहेत, हिंदी लोक आमच्यासारखेच सुसंस्कृत आणि प्रौढ आहेत, मूर्ख धर्मभोळेपणाला त्यांनींहि मूठमाती दिलेली आहे,

त्यांनाहि समता, बंधुता, स्वातंत्र्य इत्यादि तत्त्वं पटलेलीं आहेत, त्यांच्या समाजांतहि राजकीय गोष्टींची अजस्र घडामोड चालू आहे, हिंदी लोक आमच्या बरोबरीचे आहेत' असं आमचे कार्यक्रम पाहून तिकडल्या लोकांनीं म्हटलं तर त्याचं आम्हांला खरं भूषण. आम्हांला नुसते पैसे मिळवायचे नाहींत. आमच्या मायदेशाविषयीं तिकडच्या लोकमतांत जागृति केल्याचं समाधान आम्हांला मिळवायचं आहे.

[प्रवासी]

# संगीत-प्रेम

## ५

## सङ्गीत

**मैफलीचा दिवाणखाना**

रात्रीं गाण्याच्या वेळीं खानसाहेबांच्या बंगल्यांतील दिवाणखान्याला कांहीं वेगळीच शोभा आली होती. पांढरी स्वच्छ परीटघडीची बिछायत सबंध दालनभर तंग पसरली होती, आणि रोजचे गालिचे व रुजामे काढून दोन्ही बाजूंना अतिशय उंची गालिच्यांची मांडणी केली गेली होती, त्यांचे भडक चित्रविचित्र रंग त्या सफेत बिछायतीमुळें उठून दिसत होते. ठिकठिकाणीं मांडलेल्या लोडांवर उंची साटिणीचे अभ्रे चढले होते, व प्रत्येक लोडाच्या दोन्ही टोंकांना असलेल्या सरकपदराला जे झिरमिळ्यांचे गोंडे होते ते मोठ्या आढ्यतेनें फटीफटींत रुळत होते. सतत सेंटच्या पेटींत दाबून ठेवलेले उंची पडदे खिडक्यांना व दरवाजांना बसविले होते व त्या पडद्यांना वाऱ्याच्या झोतानें मिळणाऱ्या झोंक्याबरोबर मंद, अस्पष्ट सु-

गंधाची चोरटी हालचाल सगळ्या दिवाणखान्यांत झाल्यासारखी वाटे. तऱ्हेतऱ्हेच्या फुलदानांत गुच्छ घालून अंतराअंतरावर मांडले होते. त्यांतील फुलांचा सुगंधाचा अभिमान त्या सेंटच्या वासापुढें व्यर्थ ठरत होता, आणि त्यामुळें ईर्षेला पेटूनच कीं काय तीं आपल्या रंगांच्या मोहानें लोकांस आकर्षित करण्यासाठीं आपलें तें वैचित्र्यपूर्ण वैभव अधिकच मिरवीत होतीं. दिव्यांचा प्रकाश इतका झगझगीत केला होता कीं या स्थळीं एखादा नवीन सूर्यच उगवला आहे कीं काय अशा भ्रमानें बाहेरचीं चंद्रकिरणे व्हरांड्यांत येऊन तेथूनच स्तिमित होऊन परतल्यासारखीं वाटत होतीं.

[अटकेपार. २१२]

## सङ्गीताचें सामर्थ्य

त्याला वाटलें हें गाणें नव्हे तर विश्वांतलीं नानातऱ्हेचीं सौंदर्यें स्वरमालांच्या पाशांत धरून खांसाहेब आपल्यापुढें खडीं करीत आहेत खांसाहेबांच्या कंठांतून जसजशा स्वरमालिका उसळत तसतशीं उदात्त, गंभीर, चंचल, अस्थिर अशीं हजार प्रकृतीचीं सौंदर्यस्वरूपें आपल्या नेत्रांना स्पष्ट स्पष्ट दिसत आहेत असा सुधीरला भास होई. वृक्षराजींनीं आच्छादिलेले उंच उंच पहाड, त्यांच्या शिखरांशीं शिवाशिवी खेळल्यासारखें करून फिरणारे निळे काळे प्रचण्ड मेघ, त्यांच्या गंभीर गर्जना आणि भव्य दऱ्याखोऱ्यांत उठलेले त्या गर्जनेचे प्रतिध्वनि त्याला त्या गाण्यांत आहेतसें वाटलें. खवळलेल्या दर्याच्या

चार चार पांच पांच पुरुष उंच उठणाऱ्या लाटा, त्या अजस्र लाटांचा कोप शान्त करण्यासाठीं वरुणदेवतेनें वरून सोडलेल्या सहस्र जलधारा, आणि जणूं पंचमहाभूतांचा धिंगाणा थांबावा, म्हणून वाजलेल्या इंद्रवज्ररूपी प्रचण्ड प्रतोदाचा कडकडाटहि त्यांत होता. एकाला एक लागलेले ताज्या फळांफुलांनीं बहरलेले बगीचे, त्या बगीच्यांतील कुंजांच्या एकान्तांत प्रणयी जोडप्यांनीं एकमेकांच्या कानांत सांगितलेले प्रतिज्ञेचे प्रीतिशब्द, आणि त्या प्रीतिवचनांचा जणूं उपहास करण्यासाठीं पंख फडफडावीत त्यांच्या डोक्यावरून उडत जाणारं विहंगवृंदहि त्या गाण्यांत दृग्गोचर होत होते. आकाशाच्या पूर्वभागीं भव्य इंद्रधनुष्य उमटलें असतांना एखाद्या गुलाबदाणींतून शिडकाव व्हावा तद्वत् पडणाऱ्या कोंवळ्या पावसाचें मार्दव, हिरव्याचार कुरणांत सकाळच्या प्रहरींच चमकणाऱ्या दंवबिंदूंचा ताजेपणा, संकेतस्थळीं वल्लभाला भेटावयासाठीं निघालेल्या कामिनीच्या पावलांची लाडकी घाई, फार दिवसांनीं भेटलेल्या पराक्रमी पुत्राला डोळे भरून पाहण्यापूर्वींच डोळे भरून टाकून उत्कण्ठ आईची दृष्टि अंधुक करणाऱ्या अश्रुधारांतील वात्सल्य, आणि आईची मूर्ति दृष्टीस पडतांच खेळण्याचा मोह सहज टाकून तिच्याकडे धांवणाऱ्या बालकाच्या बोबडया हांकेंतील शुद्ध प्रीतीचा पडसाद— अशा अनंत प्रकारांनीं विश्वांतील सौंदर्य आपण पहात आहोंत व ऐकत अहोंत असें सुधीरला वाटलें.

त्याच्या अंतःकरणांत कांहीं एक अवर्णनीय निर्विकल्प

आनंद त्या वेळीं इतका भरला कीं राग, खेद, चिंता, महत्त्वाकांक्षा यांपैकीं कशालाच जागा उरली नाहीं.

[अटकेपार : २१५-२१६]

## सङ्गीताचें मर्म

त्या गायनांत कंठमाधुर्य होतं, लयीच्या आंदोलनांचं सौंदर्य होतं, रागाच्या शुद्ध स्वरूपाची गोडीही होती; आणि या सर्वांचा परिणाम होऊन राजाचं अंतःकरण आनंदानं उचंबळल्यावांचून राहिलं नाहीं. परंतु आपल्या आनंदांत कांहीं तरी वैगुण्य आहे असं मात्र त्याला सारखं वाटत होतं; आणि एकीकडे मधुर गायन कानांवर येतांच रसिकाच्या अंगावर अवर्णनीय समाधानाचे जे शहारे येतात त्यांचा अनुभव घेत असतां दुसरीकडे आपल्या आनंदांतील वैगुण्य शोधण्यांत राजाचं मन गुंतलं होतं. हळुहळू तें वैगुण्य कोणतं तें त्याच्या लक्षांत आलं. चंचला अत्यंत सुंदर होती व तिच्या सौंदर्यानं त्याची दृष्टि उल्लसित होत होती, तिचा गळा विलक्षण गोड होता व त्या गोडीनं त्याच्या श्रुति संतुष्ट होत होत्या. परंतु, तिच्या कंठांतून निघणाऱ्या आलापांत मनाचा उमदेपणा, बुद्धीची सहानुभवशक्ति अगर भावनांची तन्मयता त्याच्या प्रत्ययाला येत नव्हती. गायकाच्या अगर गायिकेच्या अंगीं हे गुण असले म्हणजे ऐकणाऱ्याच्या शरीरावर, मनावर आणि अंतःकरणावर ज्या कांहीं एका विलक्षण संपूर्ण प्रसन्नतेचं सिंचन घडत असतं तसल्या सिंचनाचा अनुभव राजाला येत नव्हता. चंचलेचा

आवाज निर्मळ आणि श्रुतिमनोहर होता, जो राग ती गात होती त्याचं स्वरूप अवघड असूनही मोठ्या कौशल्यानं तें ती राखीत होती, आणि तानांची कसरत करतांना एखाद्या चपल नर्तिकेप्रमाणं आरोहावरोहांच्या पसाऱ्यांतून तिचा गळा सफाईनं फिरत होता. परंतु, जी चीज ती गात होती तिच्या अर्थाशीं ती समरस झाली नव्हती. असामान्य संगीतांत स्वरमाधुर्या-बरोबर भावनांचा जो झंकार मिसळलेला असतो तो चंचलेच्या त्या गाण्यांत आढळत नव्हता.

[प्रवासी : ८४.८५]

[फडके नुसते गानलोलुप नाहींत तर विचारवन्त रसिक आहेत.]

## संगीतांतील नवमतवाद

सामाजिक पुनर्घटनेच्या वेळीं कुटुंबव्यवस्था, लग्नसंस्था, धार्मिक समजुती यांच्यांतच केवळ लहानमोठे बदल घडतात असं नव्हे-नव्हे, एवढयाच गोष्टी बदलल्या, तर सामाजिक पुनर्घटना अपुरी राहून तिच्यांतून उद्भवणाऱ्या सामाजिक व वैयक्तिक कल्याणांतहि मोठें वैगुण्य उरल्यांवाचून राहणार नाहीं. कुटुंब-व्यवस्था, लग्नसंस्था व धार्मिक आचारविचार यांच्याप्रमाणंच शिक्षण-पद्धति, न्यायदानपद्धति, व्यापार, शिष्टाचार यांतहि आवश्यक ते फेरफार करणं अपरिहार्य असतं. इतकंच नव्हे, तर मनुष्याच्या उदरनिर्वाहाशीं व योगक्षेमाशीं संबंध असलेल्या या विविध क्षेत्रां-प्रमाणेंच त्याच्या कलात्मक आनंदाशीं ज्या ज्या शास्त्रांचा, विद्यांचा व कलांचा कमीअधिक संबंध आहे त्यांतहि जरूर त्या सुधारणा

केल्यावांचून चालत नाहीं. जुनं टाकून अगर बदलून नव्याचा उपक्रम करण्याच्या इच्छेचा व प्रयत्नाचा प्रवेश त्या क्षेत्रांत व्हावा हेंच हिताचं आहे. अर्थात् समाजाच्या धार्मिक जीविताबद्दल नवमतवाद उत्पन्न होणं जितकं साहजिक आहे, तितकंच ज्या ललितकलांपासून समाजांतील हजारों स्त्रीपुरुष आनंदाची व आल्हादाची अपेक्षा करितात त्या कलांबद्दलहि नवमतवादाचा उद्भव होणं साहजिक आहे.

तेव्हां 'संगीतांतील नवमतवाद' हा शब्दप्रयोग कानीं पडल्याबरोबर आश्चर्य करण्याचं अगर बिचकण्याचं कांहींच कारण नाहीं. समाजाच्या बदलत्या परिस्थितीप्रमाणें जुने आचार अपुरे व तापदायक वाटू लागावेत व नव्या आचा-रांची गरज भासूं लागावी हा उत्क्रान्तीचा व प्रगतीचा सामान्य नियम मनुष्याच्या मनोरंजनास व कलाजन्य आनंदासही लागू आहे. लहान मुलांना ज्या वस्तूंपासून आनंद होतो अगर त्याची ज्या गोष्टींच्या योगानें करमणूक होते त्या गोष्टी व वस्तु मोठेपणीं त्याचं मन रिझवूं शकत नाहींत. व्यक्तिविका-साच्या बाबतींतला हा स्थूल नियम समाजालाहि लागू आहे. कोणत्याहि समाजाच्या उत्क्रांतीचा इतिहास आपण पाहिला तर आपल्याला असं आढळून येईल कीं आर्थिक परिस्थिती-च्या परिवर्तनामुळं त्याच्या कल्पनाहि ज्याप्रमाणें बदलतात, त्याप्रमाणें त्याच्या मनोरंजनाच्या कल्पनाहि बदलत जातात. समाज सुसंस्कृत झाला कीं ललितकलांचा उदय होतो. मनु-ष्याला आनंदाची प्राप्ति करून देणें हें ह्या कलांचं मुल्य

कर्तव्य व ध्येय असतं. परंतु मनुष्याच्या आनंदाच्या कल्पना परिस्थितीप्रमाणं बदलत जाव्या हें क्रमप्राप्त असल्यामुळं कोणत्याहि कलेचं स्वरूप तिच्या जन्मकाळीं जसं होतं तसंच नेहमीं टिकेल हें शक्य नाहीं.

कोणत्याहि सामाजिक अगर वैयक्तिक व्यवहारांत जुने आचारविचार निःसत्व आणि तापदायक ठरूं लागले, कीं त्यांच्या जागीं नव्या आचारविचारांचा उपक्रम केला पाहिजे हें नवमतवादांतील मध्यवर्ति सूत्र आहे आणि एखादा नवमतवादी जेव्हां आपल्या संगीताचा विचार करतो तेव्हां तो याच सूत्राच्या कसोटीवर संगीतविषयक प्रश्न घासून पाहतो.

## नवमतवाद्यांची भूमिका

आपल्या संगीताच्या शास्त्राशीं अगर त्याच्या थोरवीबद्दलच्या अभिमानाशीं विसंगत अशी कोणतीच मागणी नवमतवादी करीत नाहींत. आपल्या संगीतांत मान्य केलेले श्रुतींचे दर्जे बदलावेत किंवा रागव्यवस्थेचं प्रामाण्य झुगारून द्यावं किंवा स्वरांचं वादीसंवादित्व अमान्य करावं किंवा आलापविस्ताराची श्रेष्ठता कमी लेखावी असं नवमतवाद्यांचं मुळींच म्हणणं नाहीं. भारतीय संगीत अत्यंत श्रेष्ठ आहे या बद्दल नवमतवाद्यांना पूर्ण अभिमान आहे. नव्या काळांतल्या नव्या गरजांना सनातनी संगीतज्ञ बिचकतात, तर उलट आपलं भारतीय संगीत या नव्या गरजा उत्तम तऱ्हेनं भागवण्याइतकं जिवंत आणि संपन्न आहे अशी नवमतवाद्यांची श्रद्धा

आहे व त्या दिशेनं कलावंतांनीं खटपट केली पाहिजे असं ते म्हणतात. संगीतांतल्या कांहीं पुरातन रूढि व संकेत अर्थ-शून्य असले व जाचक होऊं लागले असले तर ते टाकून देण्यांतच आपल्या संगीताचं हित आहे आणि नव्या कलांच्या उदयामुळं व लोकांच्या मनोरंजनाच्या कल्पनांत बदल झाल्यामुळं कांहीं नवे आचार संगीतांत आणण्याची आवश्य-कता भासूं लागली असेल तर त्यांचा तत्परतेनें व कौशल्यानें उपक्रम करण्यांतच आपल्या संगीताची खरी प्रतिष्ठा व प्रगति आहे. सारांश, आपल्या संगीतांत सुधारणा व्हावी या म्हण-ण्याचा अर्थ त्याच्या तत्त्वांत अगर अस्सल स्वरूपांत फरक करावा असा नसून त्याच्या आविष्कारांत व आचारांत जीर्णता आली असेल तर ती टाकावी आणि नव्या काळाला योग्य असा नवेपणा आणावा एवढाच त्याचा अर्थ आहे.

[संगीतांतील नवमतवाद : प्रो. फडके याचीं गाजलेलीं भाषणें या पुस्तकांतून]

# जागतेपणचीं स्वप्नं

## ६

[सुख हें मानण्यावर आहे असें म्हणतात; फडके आयुष्यांत जें सुख उपभोगीत नाहींत त्याचीं चित्रें ते कल्पनासृष्टींत रंगवितात.]

बंगल्याप्रमाणेंच विकाऊ मोटारीच्यासुद्धां जाहिराती मी वारंवार वाचतों. आज पहा, एक 'ओपेल सलून'. एक 'व्हॉक्सॉल टूरर,' अशा किती तरी गाड्यांच्या जाहिराती आहेत. त्या सगळ्यां मीं अगदीं काळजीपूर्वक वाचणार. ज्याला खरोखरीच गाडी विकत घ्यायची आहे तो कदाचित् माझ्या इतक्या लक्षपूर्वक त्या वाचणार नाहीं! 'ओपेल सलून' गाडी बरी आहे, पण जाहिरात देणाराच म्हणतो 'Needs paint' म्हणजे गाडी पुन्हां एकदां रंगवायला पाहिजे. असली गाडी काय कामाची? 'व्हॉक्सॉल' गाडी चांगली म्हणतात, पण तिचा प्रवास पन्नास हजार मैल झाला आहे असं जाहिरातींतच म्हटलं आहे. तेव्हां त्या गाडींत तरी काय अर्थ? ही 'फियाट' गाडी छान दिसते आहे. जवळ जवळ नवीच

आहे कीं ! अन् ' five seater' म्हणजे पांच स्वाऱ्यांची आहे! आपल्या घरांतल्या सगळ्या मंडळींना घेऊन जायला बरी. छोट्या गाड्या आपल्या काय कामाच्या ? प्रसंगविशेषीं फार सोईस्कर अन् सुखाच्या खऱ्या. पण नेहमींच्या उपयोगाला म्हणजे आपल्याला भली मोठी प्रशस्त गाडीच पाहिजे. एक नामांकित महाराष्ट्रीय नट तर म्हणे आपल्या सर्व कुटुंबी-यांसह व मित्रपरिवारासह सहल करतां यावी म्हणून मोठं ट्रकच घेणार होते विकत ! त्यांनीं तें घेतलं कीं नाहीं मला कळलं नाहीं. पण त्यांची विचारसरणी बरोबर होती. आप-ल्यालाही मोठी 'फियाट' गाडीच सर्व दृष्टींनीं सोयीची. तिची किंमत या जाहिरातींत मालकानं दिलेली नाहीं. पण तिच्याशीं मला काय करावयाचं आहे? मला ती थोडीच विकत घ्यायची आहे ? छे छे ! विकत घेण्याचा प्रश्न आलाच कुठें ? उगीच चवकशी झालं! मला ती जाहिरात आवडते. ती वाचली कीं मला आनन्द होतो येवढेंच !

[नव्या गुजगोष्टी : जागेपणची स्वप्नें ! १३-१४]

रेल्वेच्या टाइमटेबलाचा सुद्धां मी पुष्कळदां असा उपयोग करतों. कलकत्त्याच्या, मसूरीच्या, दार्जिलिंगच्या गाड्या पाहून त्यांत सगळ्यांत सोयीची व कमी खर्चाची गाडी कोणती तें मी ठरवितों. त्या त्या ठिकाणच्या हॉटेलांच्या जाहिराती वाचून सर्वांत चांगली उतरायची व्यवस्था कोठें आहे तें मी बघून ठेवतों. काश्मीरला जावयास कोणता मार्ग जास्त सुखाचा तें

मोठ्या कसोशीनं मी तपासतों. त्या प्रदेशांत प्रेक्षणीय स्थळं कोणतीं आहेत, लोकांच्या रीतिभाती कशा आहेत, भाजीपाला व फळं विपुल आहेत कीं नाहींत, नदींत राहण्यासारख्या बोटी मिळतात त्यांचे दर काय आहेत, तिकडे जावयास सर्वांत उत्तम ऋतु कोणता, त्या ऋतूंत जावयाचं झालं तर कपड्यांची काय काय तयारी करावी लागते, इत्यादि त्या गाइडमध्यें दिलेली सगळी माहिती मी अगदीं लक्षपूर्वक वाचून ठेवतों. सीलोनला जावयाचं झाल्यास बोटीनं जावं कीं रेल्वेमार्गानें जावं याचा निर्णय करण्यास उपयुक्त माहिती त्या पुस्तकांत दिलेली आहे. पासपोर्ट घ्यायला पाहिजे हेंही सांगितलं आहे. कोलंबो वगैरे शहरांच्या आसमंतात् प्राचीन संस्कृतीचे अवशेष कोठें कोठें पाहण्यासारखे आहेत त्याबद्दलहि वर्णनं आहेत. तो सारा मजकूर मी नज़रेखालून घालतों. एकदां माझ्या लिहिण्याच्या टेबलावर या प्रवासी पुस्तकांचा भारा पडलेला पाहून व तीं वाचण्यांत मी गुंतलों आहें असं बघून मला भेटावयास आलेल्या एका गृहस्थांनीं विचारलं, 'प्रवासाची तयारी आहे वाटतं?' मी म्हटलं, 'नाहीं बुवा!' ते म्हणाले, 'मग हीं टाइमटेबलं कशासाठीं चाळीत आहांत?' त्यांना काय सांगायचं? मी मनाशीं हंसलों व त्यांना विचारलं, 'काय चहा घेणार कीं कॉफी?'

टाइम्सच्या मुखपृष्ठावरच्या आगबोटींच्या जाहिरातीदेखील माझ्या आवडीच्या आहेत. पी. अँड ओ कंपनीच्या, लॉइड ट्रीस्टिनो, एलरमन, डॉलर लाइन इत्यादि सगळ्या कंपन्यांच्या

बोटींचीं नांवं, त्यांचीं वजनं, त्यांच्या सुटण्याच्या तारखा मी वाचतों. ही पहा चोवीस हजार टन वजनाची 'स्ट्रॅट्मोर' नांवाची बोट. या बोटीनं मी इंग्लंडला गेलों तर जगप्रसिद्ध 'विंबल्डन'चे टेनीसचे मोठे सामने मला पाह्यला मिळतील. ही बोट फार मोठी आहे, व तिच्यावरच्या सुखसोयी फार नांवाजलेल्या आहेत. दिवसांतून सहा वेळां खावं, पोहावं, गाणं ऐकावं, खेळ खेळावे, नव्या ओळखी करून घ्याव्या.... मौजच मौज! निवान्त वेळ मिळून लिहिणंही खूप होईल आपलं! कांहीं लोकांना बोटींत मळमळत आणि केबिनमध्यें पडून राहावं लागतं म्हणतात. पण मला तो त्रास खचित व्हायचा नाहीं. कारण लहानपणापासून मला झोंपाळयावर बसून मोठाले झोंके घेण्याची हौस आहे. तेव्हां बोट हालली तरी मला मजाच वाटेल. किंवा दर्या खवळलेला असला म्हणजे तुफानाची काय अवर्णनीय शोभा असते ती आपल्याला पहायला मिळाली तर बहारच होईल! कपडे काय काय करायला पाहिजेत त्याची मात्र आपल्याला नक्की कल्पना नाहीं किंवा पासपोर्ट मिळवायसाठीं कोणकोणते विधि करावे लागतात तेंही आपल्याला नीटसं माहीत नाहीं. पण विलायतेला जाऊन आलेले पुष्कळ मित्र आहेत आपले, विचारूं त्यांना.....

अशा प्रकारच्या विचारांच्या तंद्रींत माझ्या हातचा टाइम्सचा अंक केव्हां गळून पडतो, व निद्रादेवी हळूंच येऊन नाजूक हातांनीं माझे डोळे केव्हां मिटते तें मला कळतही नाहीं. मीं कधीं समुद्रपर्यटण केलं नाहीं, व लवकर करीन

असा संभवही फारसा नाहीं. पण टाइम्समधल्या त्या बोटींच्या सुटण्याच्या वेळा मी हज़ारदां पाहतों. इतकंच नव्हे तर फ्रान्स, जर्मनी, इटली, अमेरिका, जपान इत्यादि देशांतल्या सरकारांनीं प्रवाशांच्या माहितीसाठीं जीं छोटीं, सचित्र पुस्तकं काढलीं आहेत तींही मागवून वाचतों. या सगळ्या 'रिकाम्या चवकशा'च खऱ्या, पण त्या विलक्षण सुखकारक वाटतात. 'ज्या गांवाला जायचं नाहीं त्याची वाट कशाला विचारायची?' अशी आपल्यांत म्हण आहे. पण या बोधवचनाप्रमाणं माणूस अक्षरशः वागूं लागला तर फार कठीण अवस्था होईल त्याची! मला मोटार घ्यायची नाहीं, घर बांधायचं नाहीं, किंवा परदेशाला जायचं नाहीं. पण या सगळ्या चवकशा मला फार प्रिय वाटतात. कल्पना ही एक माणसाला मिळालेली बहुमोल देणगी आहे. माणसाचं इतर सर्व प्रकारचं वैभव विनाशी आहे तें त्याच्यापासून लुटून घेतां येईल. पण माणसाचं कल्पनाधन कोण हिरावून घेऊं शकेल? अशी ही कल्पनाशक्तीहि उगीचच्या उगीच आंवरून धरायची? छेः! ती स्वैर सोडावी, अन् तिचं सुख घ्यावं. रिकाम्या चवकशा म्हणजे जागेपणचीं स्वप्नं आहेत! झोंपेंतलीं स्वप्नं सुखाचीं असतात तशींच भयदायकही असतात. तसं या जागेपणच्या स्वप्नांचं नाहीं. त्यांचं माधुर्य निरपवाद अन् अवीट आहे! कोणी कितीही शहाणपणा शिकविला तरी या माधुर्याचा ठेवा सोडायला मी तयार नाहीं!

[नव्या गुजगोष्टी : जागेपणचीं स्वप्नें. १६-१८]

# शास्त्रज्ञ फडके

## ७

### प्रतिभा म्हणजे काय ?

[फडके नुसते लेखक किंवा एखाद्या वाङ्मयकृतीचे टीकाकार नाहींत तर ललितवाङ्मयाचीं मूलतत्त्वें कोणतीं, **प्रतिभासाधन** कसें शक्य आहे वगैरेंचा ऊहापोह अत्यंत मार्मिकपणें उत्कृष्ट दाखले देऊन करतात. अवघड विषय सोपा करून सांगण्याची हातोटी फडके जातिवंत शिक्षक आहेत हें दर्शविते.]

समजा भयंकर बादळांत आपण सांपडलों आहोंत. वारा इतका सोसाट्याचा सुटला आहे, कीं जणुं साऱ्या सृष्टीची वावडी करायची त्याला लहर आली आहे. वाऱ्याच्या हातांत हाल-णाऱ्या खुळखुळ्यासारखी मोठमोठ्या प्रचंड वृक्षांची अवस्था झाली आहे, धुळीचे लोटच्या लोट उठून दशदिशा धुंद झाल्या आहेत, पक्षी नुसत्या भयानें निश्चेष्ट होऊन घरट्यांतून गळून पडत आहेत, कृष्णमेघांची आकाशांत अशी दाटी झाली आहे, कीं सूर्याला जणुं खग्रास ग्रहण लागलें आहे, आणि त्या

मेघांचा असा कांहीं गंभीर, खोल गडगडाट चालला आहे कीं, जणुं विनाशकशक्ति सृष्टिसंहाराचा अपशकुनी इशाराच देत आहेत. अशा प्रसंगीं तो गडगडाट बंद होऊन एकाएकीं हजारों बंदुका एकदम डागल्यासारखा 'काड् कडाड् कडाड् काड्' असा कानठळ्या बसविणारा आवाज व्हावा आणि मेघमालेंतून एक दीप्तिमय तेजाचा लोळ खालीं उतरून व क्षणार्धपर्यंत साऱ्या सृष्टीवर प्रभा फांकून जमिनींत गडप व्हावा.

घरीं गेल्यावर जर आपण सांगूं लागलों, कीं आम्हीं वीज पाहिली, व ती वीज कशी होती याची लोकांना नक्की कल्पना द्यावयाची झाली तर आपण काय करूं ? असेंच म्हणूं, कीं त्या विजेची कल्पना करून देणें शक्य नाहीं. यावर समजा कोणीं विचारलें, ही आपल्या घरांत रोषणाईसाठीं जी वीज आणलेली आहे तशीच ती वीज होती काय ? तर आपण काय उत्तर देऊं ? हेंच, कीं छेः छेः ! ही वीज आणि ती विद्युल्लता ! ही आणि ती एक नव्हे आणि ही कितीही पटीनें वाढविली तरी हिला तिचें स्वरूप येणें शक्य नाहीं. तिच्यांत एक विलक्षण दिव्यत्व आहे !

'दिव्यत्व !' हेंच प्रतिभेचें वैशिष्ट्य होय. ज्या ज्या वस्तूला किंवा विषयाला प्रतिभेचा स्पर्श होतो त्या त्या विषयाला दिव्यत्वाचा उजळा मिळतो व त्या वस्तूचें किंवा विषयाचें अवलोकन करणाराला त्याचा प्रत्यय येऊन एक अनिर्वचनीय आनंद होतो. हा अनिर्वचनीय आनंद निर्माण करणें हेंच सर्व कलेचें उद्दिष्ट कार्य असल्यामुळें कलाचतुराच्या अंगीं प्रतिभा अत्यवश्य

आहे. संगीत-नृत्य-चित्रलेखन यांप्रमाणेंच ललितवाङ्मय हा एक कलाप्रकार आहे. अर्थात् ललितवाङ्मयलेखकाच्या अंगीं प्रतिभा अत्यवश्य आहे. पण ही प्रतिभा म्हणजे जर कांहीं एक दिव्य शक्ति असेल तर ती साध्य करून घेण्याची येथें आरंभिलेली चर्चा निष्कारण नव्हे काय ? प्रतिभा ही जर नैसर्गिक देणगी असेल तर ज्यांना ती दुर्दैवानें मिळाली नाहीं त्यांनीं खेद करीत स्वस्थ बसावें, दुसरें काय ? निसर्गानें ज्यांना सौंदर्याची देणगी दिली नाहीं तीं माणसें नाहीं निराशेचे सुस्कारे सोडून आपला वांटा मुकाट्यानें पत्करीत ?

या म्हणण्यांत पुष्कळ तथ्यांश आहे. पण दोन गोष्टी आपण विसरतां कामा नये.

पहिली गोष्ट ही, कीं प्रतिभा ही जरी ज्याला लाभायची त्याला जन्मतःच लाभणारी शक्ति असली तरी तिचेंहि संस्करण म्हणून कांहींतरी आहेच. मधुर आवाजाची देणगी जन्मतः मिळाली तरी त्या आवाजावरहि सतत उद्योगाचा व पद्धतशीर अध्ययनाचा संस्कार झाल्याविना अलौकिक गायक तयार होत नाहीं. नुसत्या कष्टांच्या योगानें कलावंत निर्माण होत नाहीं, हें प्रतिपादण्याच्या भरांत उद्योगाचें आणि मेहनतीचें महत्त्व अजिबात विसरण्याची चूक आपल्या हातून होतां कामा नये. कोळशावर कितीहि संस्कार केले तरी त्याचा हिरा होणारा नाहीं; परंतु मी खाणींतून निघाल्याबरोबर सरळ लोकांच्या अंगावर अलंकार म्हणून जाऊन बसेन असें हिरा मानूं लागला तर तें कितीसें बरोबर ठरेल ? तद्वत् प्रतिभा जन्मसिद्ध खरी; पण तिचेंहि तेज फांकायला तिला

परिश्रमपूर्वक पैलू पाडण्याचें काम झालेंच पाहिजे. आणि वास्तविक प्रतिभेचें पूर्ण उत्कट स्वरूप प्रकट व्हावयास आपण समजतों त्यापेक्षां कितीतरी पटींनीं अधिक परिश्रमांची कानस तिच्यावर घांसली जावी लागते. स्फूर्ति स्फूर्ति आपण जिला म्हणतों तिच्यांत दहा टक्के निसर्गदत्त देणगीचे तर नव्वद टक्के निढळाच्या घामाचे असतात असें एका ग्रंथकारानें म्हटलें आहे. हें जर खरें असेल तर प्रतिभेचें संस्करण या अर्थीं प्रतिभा-साधन हा विचार करण्यासारखा विषय ठरत नाहीं काय?

[प्रतिभासाधन. ८–९.]

## वास्तव आणि ध्येय

ललितसाहित्यांत वास्तव आणि ध्येय किंवा कल्पित यांचं मिश्रण अपरिहार्य आहे. पंचनेंद्रियांप्रमाणें व बुद्धीप्रमाणें माणसाला कल्पना निसर्गानें दिलेली आहे; प्राप्य, संभाव्य, ध्येय इत्यादींशीं लीला करणं हें या कल्पनेचं नियतकार्य आहे. सामान्य माणसाच्या ठिकाणीं असलेल्या कल्पनाशक्तीहून शतपटीनं अधिक तीव्र, सूक्ष्म, सर्वगामी आणि प्रभावी कल्पनाशक्ति ललितलेखकाच्या ठिकाणीं असते. या गोष्टी ज्या अर्थी खऱ्या आहेत त्या अर्थी ललितसाहित्यांत वास्तव आणि ध्येय यांचं मिश्रण नेहमींच आढळणार यांत शंकाच नाहीं. जें घडलं त्याची नोंद करणं हें इतिहासाचं कार्य आहे, कादंबरीचं अगर नाटकाचं नव्हे. अमुक गोष्ट घडली असं वर्णन करतांना त्या गोष्टीऐवजीं अमुक गोष्ट घडली असती तर फार बरं झालं असतं, असं

ध्वनित केल्यावांचून ललितलेखकाला राहावत नाहीं. इतकेंच नव्हे तर ज्या गोष्टी प्रत्यक्षांत घडत नाहींत त्या घडल्या अशी कल्पना करून त्यांच्या वर्णनांत ललितलेखकानं स्वतः रंगून जावं आणि वाचकांनाहि घटकाभर रमवावं हें अपरिहार्य होय. प्राप्त आणि प्राप्य किंवा वास्तव आणि ध्येय यांच्यांत मोठं अंतर आहे असा प्रत्यय हें मानवी जीवित पुनःपुन्हा आपल्याला देत असतं. उलट हें अंतर नाहींसं करण्याची कामगिरी ललितसाहित्याकडून होत असते. प्रत्यक्ष व काल्पनिक या दोहोंच्या मधोमध जीवितानं ओढलेल्या सरहद्दीच्या रेषा स्पष्ट असतात, पण ललितसाहित्यांत त्या पुसटच असल्या पाहिजेत. वास्तव आणि ध्येय यांच्या उभ्या-आडव्या धाग्यांनीं ललितकृतींचं वस्त्र विणलं जावं हेंच उचित होय. वास्तव आणि ध्येय यांमध्यें विरोध आहे अशी कल्पना करून वास्तववाद कीं ध्येयवाद असं भांडण खेळणं चुकीचं आहे.

[ वास्तव आणि ध्येय : प्रो. फडके यांची गाजलेलीं भाषणें या पुस्तकांतून ]

* * * *

मनुष्य असा आहे एवढंच वर्णन न करतां मनुष्यानं असं असावं असं सांगण्याचं ललितलेखकाचं नियतकार्य होय हें कबूल; परंतु अशा प्रकारं ध्येयाचं दिग्दर्शन करतांना ललितलेखक निसर्ग अजिबात सोडून फार उंच गेला तर मोठी रसहानि झाल्यावांचून राहात नाहीं. आकाशांत भरारी घेतांनाहि खालीं घरट्यावर दृष्टि ठेवणाऱ्या घारीप्रमाणं ललितलेखकाची

वृत्ति असायला पाहिजे. ध्येयाचं वर्णन वाचतांना हें ध्येय केवळ कल्पनारम्य आहे, आपल्या आटोक्यांत कधीं येणं शक्य नाहीं, असं वाचकाला वाटतां कामा नये.

[गाजलेलीं भाषणें या पुस्तकांतून]

ध्येयाचा प्रकाश असा प्रखर नसावा, कीं त्याकडे पाहतांच दृष्टि दिपून डोळ्यांवर अंधारी येईल अन् अजिबात कांहींच दिसेनासं होईल. त्या प्रकाशांत वास्तवाचं स्वरूप अधिक स्पष्ट होईल आणि त्या वास्तवांतल्या निरगांठी सोडवितां येतील इतक्या बेताचा तो असावा.

[गाजलेली भाषणें या पुस्तकांतून]

## कलेची सोपी व्याख्या

मला एकदां एका गृहस्थांनीं विचारलें,

"ललितवाङ्मय ही कला आहे काय?"

"निःसंशय." मीं म्हटलें.

"कलेची व्याख्या काय?" त्यांनीं विचारिलें.

मीं म्हटलें, "सांगतों."

"अगदीं सोपी अशी सांगा अं! पंडितमन्यांच्या अगडबंब व्याख्यांची मला भीति वाटते." त्यांनीं अगदीं काकुळतीनें सूचना दिली.

मीं त्यांना आश्वासन दिलें,

"कांहीं हरकत नाहीं. अगदीं सोप्या शब्दांत कलेची व्याख्या सांगतों. हें पहा, जी दिसायला सोपी दिसते, पण

करायला कठीण असते ती कला. जी दिसते सोपी, पण असते कठीण ती कला."

[वाङ्मयविहार. १]

## कला व तिचें तंत्र

प्रत्येक कलेंत 'तंत्र' म्हणून कांहीं तरी असतेंच, व हें तंत्र संपादन केल्याशिवाय कलावंताचें भागत नाहीं. गायन, वादन, नृत्य, रंगकाम अशा सर्व कलांत कलावस्तूची मांडणी कांहीं एक विवक्षित 'तंत्र' (Technique) संभाळून करावयास हवी असते. मागें अंतःकरणाची जी तयारी सांगितली त्या तयारी-इतकेंच या तंत्राला महत्त्व आहे. प्रतिभासंपन्न कलावंताच्या बाबतींत कित्येक वेळां असें होतें, कीं त्यानें हेतुपूर्वक खटपट न करितां त्याची कृति साऱ्या तंत्राला अनुसरून निर्माण होते. अमक्या अमक्या तंत्रनियमांच्या अनुरोधानें काम केलें पाहिजे अशी जाणीव त्यानें न बाळगतां त्याची कृति तयार होते ती सर्वस्वीं त्या तंत्रनियमांस अनुसरून होते. किंबहुना, अशा प्रकारें सहजासहजीं तंत्रशुद्ध सुंदर कलावस्तु तयार व्हावी यांत प्रतिभेच्या विलासाची परमावधि आहे. प्रतिभेच्या विकासाच्या वेळीं हेतुपूर्वक विचारांस वावच नसतो असें जे एक इंग्रजींत सुभाषित आहे याचा अर्थ हाच. प्रतिभासंपन्न गायक गात असतांना तंत्रनियमांकडे त्याचें चित्त नसतें. त्याच्या कंठांतून मधुर स्वरांच्या मालिका बाहेर पडत असतात. आवेशाच्या ऐन भरांत आलेला वक्ता सारी शुद्धबुद्ध विसरून

बोलत असतो; व तंत्राची जाणीव न उरून केलेल्या ह्या हृदयस्पर्शी भाषणांत वक्तृत्वकलेचें विशिष्ट तंत्र प्रकट व सिद्ध होत असतें. दिव्य दृष्टीच्या विभूतींचें असें असतें, कीं त्यांनीं बोलावें व अर्थानें त्यांच्या शब्दामागोमाग धावावें. प्रतिभाविलसनाच्या उत्कट क्षणीं असेंच होतें. कलावंत कृति करीत जातो, व सारें तंत्र (Technique) त्या कृतींत सहजासहजीं दिसूं लागतें.

परंतु प्रतिभाविलासाची ही अलौकिक पर्वणी सोडली तर प्रतिभासंपन्नालाही त्या त्या कलेच्या तंत्राचा अभ्यास करणें आवश्यक आहे. कल्पनाशक्ति तेजस्वी व बहुप्रसवी व्हावी यासाठीं जसें लेखकानें सतत परिश्रम केले पाहिजेत तसेंच आपलें कथालेखन तंत्राच्या दृष्टीनें शक्य तितकें निर्दोष व्हावें म्हणून त्यानें कष्ट केले पाहिजेत. लेखकाच्या अंगीं प्रतिभा असली तरी तंत्राला धिक्कारून तिचा प्रकाश पडावयाचा नाहीं. उलट प्रतिभासंपन्न तंत्रामध्यें मुरत चालला, कीं त्याच्या लेखनाला अधिकअधिक बाळसेदारपणा यावयास लागतो. प्रतिभेच्या दृष्टीनें असामान्य ठरलेल्या लेखकांचें प्रारंभींचें लेखन सुंदर असलें तरी कोंवळें आणि अल्लड वाटतें. याचें कारण हेंच, कीं त्या लेखनाच्या काळांत लेखकाला तंत्राचा पोंच यावा तितका आलेला नसतो. बालवयांत आपल्या गाण्यानें सर्वांना लुब्ध करणाऱ्या पंधरा सोळा वर्षांच्या मुलाचें गाणें कितीही मधुर वाटलें तरी तंत्राच्या दृष्टीनें शुद्धतेचें वजन त्याला अजून यावयाचें आहे असें वाटल्यावांचून राहात नाहीं.

नृत्यांत, रंगकामांत–सर्व कलांत अशीच स्थिति असते इतकेंच नव्हे टेनीस, क्रिकेट इत्यादि कलातुल्य क्रीडाप्रकारांतहि हाच न्याय लागू आहे. यांतही तंत्र (Technique) म्हणून कांहीं तरी आहेच, आणि सतत उद्योगानें व डोळस अभ्यासानें या तंत्रावर पकड जशजशी अधिक बसत जाते तसतसा खेळणाऱ्याच्या नैपुण्यांत बोज उत्पन्न होत जातो. गामासारख्या पहिलवानानें प्रतिपक्षाशीं नुसती हातमिलानी केली आणि चार पवित्रे टाकून लाल मातींत हालचाल केली तरी शेंकडों मैलांवरून आलेल्या प्रेक्षकांना पैसे वसूल झाल्यासारखें वाटतें याचें कारण गामाच्या त्या एकेका पवित्र्यांत मल्लयुद्धाचें तंत्र स्पष्ट दिसतें हेंच होय. ललितलेखनांतही तंत्राचें महत्त्व असेंच आहे. प्रतिभेला मोल फार आहे हें तर खरेंच, परंतु प्रतिभासंपन्न लेखकाचें वाङ्मय सर्वतोपरी सुंदर आणि परिणामकारक व्हावयास त्यानें तंत्र पूर्णपणें साध्य करून घेतलें पाहिजे हेंही खरें.

[प्रतिभासाधन. ६८-७०.]

[कोणीही नवीन तत्त्वें प्रतिपादूं लागला कीं विरोध हा व्हावयाचाच !]

## नव्याजुन्याचा झगडा

संस्कृतींत जुनी अन् नवी असा भेद करून त्याबद्दल कोणी हटवाद धरून बसलं, की मला हंसूंच येतं. संस्कृति संस्कृति म्हणजे काय? परिस्थितीचा ताप न होतां तिच्या प्रकाशाचा उपभोग मात्र घेतां यावा म्हणून चालीरीतींची जी एक छत्री

आपण हातीं धरतों ती. सूर्य बदलला कीं आपण छत्रीचा झोंक पालटीत नाहीं का? संध्याकाळीं सूर्य पश्चिमेला आला तरी सकाळच्या जुन्या तऱ्हेनंच मी छत्री धरीन म्हणणारा शहाणा का? हट्टानं छत्री पूर्वेस धरून क्लेश सोसण्याचा करार त्यानं दाखवला म्हणून त्याचं मत नाहीं कांहीं बरोबर ठरत!

[अटकेपार. ५३-५४]

## ललितवाङ्मयाचा आद्य हेतु

लोकजागृति किंवा मतप्रचार हा ललितलेखनाचा आद्य हेतु नाहीं. ललितलेखन हा एक कलाप्रकार आहे, व इतर कलांप्रमाणेंच या कलेचाहि आद्य हेतु सौंदर्यनिर्मितीच्या द्वारें लोकांना पुन:प्रत्ययाच्या आनंदाचा अनुभव देणें हा होय.

[साहित्यसंसार. ७०.]

## अक्षरवाङ्मयाचा गुणविशेष

या मानवी भावनांच्या आडव्या-उभ्या धाग्यांनींच प्रत्येक व्यक्तीच्या संसाराचें वस्त्र विणलें जात आहे. त्या वस्त्राची लांबी-रुंदी, जाडपणा अगर तलमपणा, आणि आकार भिन्न भिन्न बनतात. परंतु त्यांतले आडवे-उभे धागे एकच असतात. या धाग्यांची गुंतागुंत आणि उकल करून दाखविणें हेंच प्रत्येक ललितकथेचें नियोजित कार्य आहे. ती गुंतागुंत आणि उकल पाहिली कीं वाचकाला अगर प्रेक्षकाला आनंद होतो. ज्या ललितकथेंतील हा आनंद लवकरच जुना होतो, ती कालांतरानें लोकांच्या स्मरणांतून नाहींशी होते; आणि उलट ज्या ललितकथेंतील हा आनंद कधीं विटत नाहीं, तिचें वाचकांना कधीं

विस्मरण होत नाहीं. ती अक्षरवाङ्मयांत समाविष्ट होते. म्हणजे अक्षरवाङ्मयाचा गुणविशेष कोणता या प्रश्नाचें उत्तर त्याच्या ठिकाणची 'आनंद' देण्याची अविच्छिन्न शक्ति असेंच दिलें पाहिजे.

[साहित्य आणि संसार. १५.]

## अश्लील म्हणजे काय ?

'अश्लील' या शब्दाची व्याख्या तरी काय, असें मला कोणीं विचारलें, तर मी सांगेन, जें 'ग्राम्य' तें अश्लील. अडाणी, अशिक्षित लोक अचकटविचकट शब्द थोडे का उच्चारतात ? तें ऐकून आमचीं मुलें बिघडताहेत अशी कोर्टांत कुणी तक्रार-ही करीत नाहीं, किंवा त्या शब्दाच्या युक्तायुक्ततेबद्दल आपण विचारही करीत नाहीं. आपण मनाशीं एवढेंच म्हणतों, हे लोक गांवढळ आहेत, यांची भाषा अशी ग्राम्य असायचीच. हाच न्याय अश्लील वाङ्मयाला लागूं करायला आपण शिकलें पाहिजे. कोणत्याहि समाजांत 'ग्राम्य' लोक असायचेच. त्याच-प्रमाणें वाचकवर्गांत ग्राम्य वाङ्मय आवडीनें वाचणारे असा-यचेच. यांची संख्या आज विशेष वाढत चालली आहे अशी चिंता अगर भय दाखविणें वेडेपणाचें होय. दरवर्षीच उन्हाळा सुरू झाला कीं यंदा उन्हाळा जास्ती आहे बुवा' असें आपण एकमेकाला म्हणतों, पण वास्तविक उन्हाळ्याचें मान दरवर्षीं असतें तेंच असतें ! हाच प्रकार अश्लील वाङ्मयाचा. अश्लील वाङ्मय नव्हतें केव्हां आणि कुठल्या भाषेंत ? अश्लील पुस्तका-संबंधीं खटला सुरू झाला, कीं संस्कृतांतले आणि इंग्रजींतले अश्लील लिखाणाचे उतारे देऊन आरोपीचा बचाव करण्याची जी

ठरीव पद्धत आहे, तिचासुद्धां अर्थ येवढाच कीं अश्लील वाङ्मय सदासर्वकाळीं होतें आणि असणार. ज्या ग्राम्य लोकांना त्याची आवड असेल ते तें वाचतील ! पण ज्यांची अभिरुचि सुसंस्कृत आहे ते त्याचा धिक्कार करतील, ही खात्री ठेवून अश्लील वाङ्मयाची उपेक्षा करावी हाच सुज्ञांचा मार्ग. हा मार्ग सगळ्यांनीं अवलंबिला तर साहित्यपरिषदेंत आणि कोर्टकचेऱ्यांत पुनःपुन्हा डोकें वर काढणारें तें अश्लीलतेचें 'खटलें' कायमचे निकालांत निघेल.

[साहित्य आणि संसार : अश्लीलता. १३६.]

[अनेक टीकाकारांच्या मतें फडक्यांच्या प्रतिभेस लागलेलें इष्ट वळण म्हणजे फडक्यांची देशाच्या स्वातंत्र्याच्या झगड्याकडे झालेली अभिमुख दृष्टि होय.]

## टिळक आणि गांधी

आपल्या असहकारितेच्या चळवळीसाठीं महात्मा गांधी सबंध देशाला जागृत करूं पहात होते. लोकमान्य टिळक त्या चळवळीच्या इष्टानिष्टतेविषयीं साशंक असल्याचा लोकांत बोभाटा होता. हे दोन मोठे पुढारी एकमेकांच्या हातांत हात घालून देशाच्या राजकारणाचा शकट हांकतात, कीं देशांत दोघांचे दोन स्वतंत्र पक्ष निर्माण होतात याची चर्चा देशांत जिकडे-तिकडे चालली होती.

पण या चर्चेला जुलई महिन्याच्या शेवटच्या आठवड्यांत एकाएकीं पायबंद बसला.

लोकमान्य टिळक मुंबई इथं सरदारगृहांत मोठ्या तापानें आजारी पडले! सबंध देशाचें लक्ष बाकीच्या सर्व गोष्टींवरून उडून त्या महापुरुषाच्या रुग्णशय्येभोंवतीं घुटमळूं लागलं.

पुणे शहरांत तर जिकडेतिकडे दुःखाची अवकळा पसरली. प्रत्येकाला थोडाच लोकमान्य टिळकांना प्रत्यक्ष भेटून त्यांचा समाचार घेतां येण्यासारखा होता! पण निदान ज्या शहरांत आपल्याच पुण्यनगरीची शोभा अत्यवस्थ होऊन शय्येवर पडली आहे, त्या शहरीं नुसतं जाऊन तरी आलें पाहिजे असें प्रत्येकाला वाटत होतं. जो उठला तो पुण्याहून मुंबईस जाऊं लागला.

राजाभाऊही मुंबईस गेला.

ज्या सरदारगृहाच्या इमारतींत टिळकांचा देह मृत्यूशीं झगडत होता त्या इमारतीला एखाद्या यात्रास्थानाचं स्वरूप प्राप्त झालं होतं. शेंकडों लोकांचे थवेच्या थवे इमारतीच्या दारापाशीं अष्टौप्रहर घोटाळत असत. दैनिक वृत्तपत्रांच्या साध्या व जादा अंकांत टिळकांच्या प्रकृतीची ताजी बातमी छापून येई. पण केवळ ती वाचून कुणाचं समाधान होत नसे. डॉक्टरांचा जागता पहारा टिळकांच्या भोंवतीं असल्यामुळें त्यांच्या भेटीला जायची जवळ जवळ बंदीच होती. पण टिळकांची भेट अगर दर्शन जरी अशक्य असलं तरी ज्या मजल्यावर टिळकांचा बिछाना होता तिथल्या लोकांची नुसती हालचाल पाहून समाधान मानण्यासाठीं लोक तासन् तास इमारतीभोंवतीं ताटकळत उभे राहात!

टिळकांची निकटवर्ती मंडळी पंजाबरावांचा मुलगा म्हणून

राजाभाऊला ओळखीत असल्यामुळें वर टिळकांच्या खोली-पर्यंत त्याचा प्रवेश झाला. तेथून हलण्याची त्याची इच्छा नव्हती. स्वयंसेवक बनून त्यानं आपल्याकडे काम घेतलं. तें काम करतांना आजूबाजूस जें दृश्य त्याला दिसे तें पाहून त्याचं भावनाप्रधान अंतःकरण वारंवार भरून येई. मुंबईच्या बहुतेक सर्व नामांकित डॉक्टर मंडळींनीं आपलीं नित्याचीं कामं जवळ जवळ टाकून दिलीं होतीं व अहोरात्र परिश्रम चालविले होते. मोठमोठे पुढारी समाचारास येत ते बाहेरच्या खोलींत खिन्न वदनानं बसत, व दीनवाणी मुद्रा करून 'हा पुढाऱ्यांचा पुढारी मृत्युमुखीं पडला तर कसं व्हायचं?' असं न बोलतां एकमेकाला विचारीत. स्वयंसेवक मंडळींनीं वरच्या मजल्या-पासून रस्त्यापर्यंत अखंड माळ धरली होती, व कुणीं तरी आपल्याला कांहीं तरी काम सांगावं व आपल्याकडनं तें व्हावं अशा उत्साहानं इतर शेंकडों स्वयंसेवक चोवीस तास तयार होते. कसंही करून लोकमान्य टिळकांना वांचवलं पाहिजे अशी तीव्र चिंता थोरापासून तों लहानापर्यंत प्रत्येकाच्या मुद्रे-वर स्पष्ट दिसत होती. 'तुझे प्राण दिलेस तर लोकमान्य वांचतील. देतोस तुझे प्राण?' असा प्रश्न यमदूतांनीं केला असता तर त्या गर्दींतल्या कुणाही व्यक्तीनं 'होय' असाच चटकन् जबाब दिला असता. टिळकांचे प्राण वांचविणं येव-ढाच त्या दिवसांत राष्ट्रसेवेचा अर्थ होऊन बसला होता. 'टिळकांना आतां जरा आराम वाटतो आहे' असं हलक्या आवाजांत शेजारच्या इसमाला सांगणारा इसमसुद्धां तें सांगण्यांत

आपण एक प्रकारची राष्ट्रसेवा करतों आहोंत अशा आवि-र्भावानं ते शब्द उच्चारी.

तें सारं पाहून राजाभाऊचं अंतःकरण वारंवार सद्गदित होई; व टिळकांच्या प्रकृतीच्या चिंतेबरोबरच ज्या मायदेशाच्या सेवेंत टिळकांनीं आपलं आयुष्य वेंचलं त्या मायदेशासाठीं आप-णही कष्ट सोसले पाहिजेत अशी भावना त्याच्या मनांत उचं-बळून येई. तीच भावना त्याला भोंवतालच्या प्रत्येक चेहऱ्यावर दिसे. मग त्याच्या मनांत येई—थोर विभूति आपल्या कृतीनं अन् भाषणानं तर इतरांच्या अंतःकरणांत पराक्रमाची ज्वाला प्रदीप्त करतातच; पण ते अखेरच्या शय्येवर निजले असतांना त्यांची निद्राही तेंच काम करीत असते!

टिळकांना मृत्युमुखांतून सोडविण्यासाठीं मानवी उद्योगाची पराकाष्ठा झाली. पण अखेर ती निष्फळ ठरून ता. १ ऑगस्ट रोजीं त्यांचं प्राणोत्क्रमण झालं.

मुंबईस टिळकांच्या शवाची प्रचंड यात्रा निघाली. आणि मंगळवार ता. ३ ऑगस्ट रोजीं त्यांच्या अस्थि पुण्यास आणण्यांत आल्या. तेव्हां स्टेशनपासून गायकवाडवाड्यापर्यंत जी मिरव-णूक निघाली ती तर अपूर्व होती. दोन मैल लांबीच्या मार्गा-वरील प्रत्येक लहानमोठं घर माणसांनीं फुलून गेलं होतं. सज्जांवर, छपरांवर, झाडांवर-जागा सांपडेल तिथं—माणसं उभीं होतीं. एका मोठ्या चारचाकी रथावर पालखी ठेविली होती. व त्या पालखींत टिळकांच्या अस्थींची लहानशी चंदनी पेटी ठेवली होती. स्वयंसेवक मंडळी रथ ओढीत होती. रथापुढें

भजनी दिंड्या एकामागोमाग चालल्या होत्या व त्यांच्या टाळ-मृदंगांच्या नादानं दिशा भरून गेल्या होत्या. भजनाच्या शब्दांत 'वंदेमातरम्'चा जयशब्द आणि शिवाजीमहाराजांपासून तों खुद्द टिळकांपर्यंतच्या राष्ट्रभक्तांचा जयजयकार पुन:पुन्हा मिसळत होता. वरून पाऊस पडत होता तरी कुणाला त्याची क्षिति नव्हती.

हा शोकसमारंभ आटपून दुपारीं दोन वाजतां राजाभाऊ आपल्या खोलीवर आला तो एकदम अंथरुणावर अंग टाकून स्फुंदून रडत पडला.

'मी टिळकांच्या समाचाराला जाऊन येतों' असं सांगून तो मुंबईस गेला तो आज सात दिवसांनीं उमाला पुन्हा दिसला. ती त्याच्या खोलींत गेली व त्याच्याजवळ बसली. तिच्याही डोळ्यांतून अश्रु वहात होते आणि तिलाही हुंदके येत होते. पण त्याच्या मस्तकावर हात थोपटीत ती म्हणाली,

"हें काय हें ?"

राजाभाऊनं तिच्याकडे पाहिलं अन् तीही रडत आहे असं दिसतांच त्याला फार बरं वाटलं. ती स्त्री व आपण पुरुष आहोंत या अवधानाला त्या क्षणीं अवकाशच नव्हता. त्यानं तिच्या मांडीवर मस्तक टेकलं आणि सद्गदित स्वरानं तो म्हणाला,

"उमा, टिळक गेले !........ आपण सगळींजणं आतां पोरकीं झालों ग !"

[प्रवासी. १७९-१८२.]

गांधींच्या चारित्र्याविषयीं शंकेला जागा नसली तरी

त्यांच्या मुत्सद्दीपणाबद्दल केवळ अंधत्वानं निःशंक राहणं कठीण होतं. त्यांनीं १९१९ चा सत्याग्रह एकाएकीं तहकूब केला त्या वेळींहि राजाभाऊला मनांतल्या मनांत त्यांचा राग आला होता; आणि पुन्हा १९२२ सालीं करबंदीच्या युद्धासाठीं सज्ज झालेल्या बार्डोलीच्या८७००० शेतकऱ्यांना त्यांनीं अकस्मात निमूटपणें परत फिरण्याचा हुकूम केला ही बातमी जेव्हां त्याला तुरुंगांत कळली तेव्हांहि त्याला त्यांचा मनस्वी राग आला होता. चळवळींत सामील होऊन तुरुंगांत गेलेल्या हजारों स्वयंसेवकांना गांधींचा राग आल्याचं त्याला माहीत होतं. नेहरु पितापुत्र आणि लाला लजपतराय गांधींच्यावर संतापल्याच्या बातम्या त्यानं ऐकल्या होत्या. राजाभाऊला वाटे, हे मोठे मोठे पुढारी गांधींच्या चळवळीला योग्य तें स्वरूप कां देत नाहींत ? त्यांनीं नुसतं त्यांच्यावर संतापावं, पण गांधींचा कार्यक्रम अमान्य करण्याची वेळ येतांच 'तुम्ही आमचे परात्पर गुरु, तुम्ही ठरवाल तें आम्हांला मान्य आहे' असें म्हणून हात जोडावेत हा काय विलक्षण चमत्कार ? अशा विचारांनीं नेहरूंचा आणि लाला लजपतरायांचाही त्याला राग येई. गांधींच्या विरुद्ध आपला शब्द प्रभावी करण्याइतका एकही बलिष्ठ पुढारी ह्या घटकेला महाराष्ट्रांत असूं नये या दुर्दैवाचाहि त्याला राग येई......... आणि मनांतला राग व चीड व्यक्त कशीं करावीं हें तर त्याला मुळींच समजत नसे. तो स्वतः कांहीं कोणी मोठा पुढारी नव्हता. त्याचं वय लहान होतं. ज्ञान थोडं होतं. तपश्चर्या अल्पकालाची होती. जे खरोखर

मोठे पुढारी होते त्यांनीं गांधींच्या चळवळीचं स्वरूप बदललं पाहिजे असं त्याला वाटत होतं. पण गांधींच्या नाराजीला ते सगळे भीत होते हें त्याला स्पष्ट दिसत होतं. त्याला स्वतःला दोनच मार्ग मोकळे होते. एकनिष्ठा कायम ठेवून प्रवाह-पतिताप्रमाणें चळवळींत राहून आंदोलनं सोसायचीं किंवा कांहीं काळ चळवळीची ईर्षा सोडून देऊन कांहींशा विश्रांतींत लहरीप्रमाणं मनाचं समाधान शोधायचं.........

राजाभाऊनं यांपैकीं दुसरा मार्ग पतकरला.

[प्रवासी. २२८-२२९.]

महात्म्याची सूचना ती! तिला वटहुकूम म्हणायचं नाहीं, येवेढंच! राजा बोले आणि दळ हाले या न्यायानं कायदेभंग सहा आठवडे तहकूब झाल्याचा जाहीरनामा काँग्रेसच्या अध्यक्षांनीं ताबडताब काढला!

गांधी सुटले म्हणून कुणालाहि आनंद वाटण्यासारखा होता. पण त्यांची एकवीस दिवसांच्या उपोषणाची घोषणा आणि त्या घोषणेच्या पोटांतून निघालेला कायदेभंग-तहकुबीचा जाहीरनामा या विचित्र घटना सगळ्यांनाच आनंदकारक वाटण्यासारख्या नव्हत्या. विशेषतः सुरेंद्र आणि त्याचे सहकारी मित्र यांना तर त्या बातम्या ऐकून समाधान वाटण्याऐवजीं चीडच आली. बरेच दिवसांपासून गांधींच्या व्यक्तिमाहात्म्याला काँग्रेसमधले बरेच लोक कंटाळूं लागले होते. विशेषतः या लोकांत समाजसत्तावादी मताची जी तरुण मंडळी होती ती आपली ही नापसंती वेळो-वेळीं स्पष्ट शब्दांत व्यक्त केल्यावांचून राहात नसत. त्या मंडळींचा

सुसंघटित असा पक्ष अजून तयार झाला नव्हता. मीरतच्या खटल्यांत अडकावून हिंदुस्थानांतल्या सर्व प्रमुख कम्यूनिस्टांना १९३३ च्या जानेवारींत सरकारनें जबर शिक्षा दिल्यामुळें कम्यूनिस्ट विचारसरणीच्या लोकांना कांहीं काळ अज्ञातवासासारखा काढणें भाग होतें. म्हणून ही मंडळी कॉंग्रेसमध्यें राहूनच तिच्या आज्ञा पाळीत होती व तिचे कार्यक्रम पार पाडीत होती. असं केल्यानंच आपली देशभक्ति व त्याग सिद्ध होऊन आपलं बल वाढेल व आज जरी कॉंग्रेसमध्यें आपण अल्पसंख्य असलों तरी कालान्तरानं बहुसंख्य होऊन आपल्या मतांचा पगडा आपण कॉंग्रेसवर बसवूं शकूं असा त्यांच्या मनांतला हिशोब असावा. पण एकीकडे कॉंग्रेसचे कार्यक्रम पार पाडीत असतांना दुसरीकडे मनांतल्या मनांत त्यांना सारखं वाटत असे, कीं कॉंग्रेसच्या कार्यक्रमाची दिशा चुकत आहे, कॉंग्रेसचं राजकारण ज्या तत्त्वज्ञानावर अधिष्ठित झालं आहे तें सदोष आहे, कॉंग्रेस ब्रिटिश राजसत्तेशीं झगडत आहे खरी पण अजून हिंदी भांडवलवाल्यांच्या हातांत आहे! आणि गांधींच्या अगम्य लहरीप्रमाणें कॉंग्रेसच्या सैन्याला 'आगे बढो' किंवा 'ठेरो' असे हुकूम सुटत असावेत याबद्दल तर या मंडळींना विलक्षण राग येत असे.

[समरभूमि. ८०-८१.]

# जीवनाकडे बघण्याची दृष्टि

## ८

संसार म्हणजे एक धकाधकीचा खेळ आहे. त्यांत लागायचंच, खरचटायचंच, पडापडी व्हायचीच. एखाद् वेळेस जखमसुद्धां व्हायची. पण म्हणून चिडून तो खेळ टाकून का शहाण्या माणसानं जायचं ? नव्हे; उलट त्या खेळांत आणखी आणखी उत्सुकतेनं, वाढलेल्या ईर्षेनं, आणखी विस्तृत दृष्टीन घुसलं पाहिजे. असं केल्यावर सुखासाठीं अरण्यांत जायला नको. तें सदैव आपल्याजवळच आहे.

मग संन्यास घेणाऱ्या भाऊरावांचं अभिनंदन करण्यासाठीं मी त्या दीक्षेच्या समारंभाला काय म्हणून जाईन ?

मी नाहीं जाणार !

[नव्या गुजगोष्टी : घरकुलांतील दुःखं ! ३१.]

सर्वांना त्यांच्या हिताची एकच गुजगोष्ट सांगतों, कीं त्यांनीं जीविताच्या रस्त्यावरून धांवत पळत जाण्याऐवजीं रमतगमत स्वच्छंदानें सर्व सुंदर वस्तूंचा उपभोग घेत सहल करावी. मग सुखाचा शोध निराळा करावयास नको.

[गुजगोष्टी : सहल. १५७.]

['प्रतिभे'च्या दुसऱ्या वर्षीं प्रो. फडके ह्यांच्याबद्दल गैरसमज पसरविणारें असें एक विधान अहेतुकपणें 'प्रतिभें'तून प्रसिद्ध झालें होतें. त्याबद्दल प्रो. फडके ह्यांस श्री. मोटे यांनीं पत्र लिहिलें असतां त्याला त्यांनीं पुढीलप्रमाणें उत्तर दिलें]:—

"I am a great lover of cricket. I play cricket myself, and expect others to 'play the game'. Which means I'm always too willing to forget and forgive. If, however, anybody starts bowling 'body-line' at me, I've a pair of steel wrists, and I'll unfailingly hit out. Believe me, however, that I've no grudge whatever with the Pratibha, and I honestly wish it the best of luck."

* * *

"जीविताला सागराची उपमा दिलेली तुम्हीं पुष्कळदां ऐकिली असेल. पण सागरापेक्षां बाजाराची उपमा या जीविताला अधिक शोभेल. जीविताच्या या बाजारांत एका सुखाची किंमत द्यावी तेव्हांच दुसरें सुख मिळतें. सुखासाठीं अगर यशासाठीं प्रयत्न हा चालू ठेवलाच पाहिजे; पण अखेर प्रयत्नाच्या काटे-तोल प्रमाणांत यश मिळेलच असें सुद्धां नाहीं. दुःख बहुतांशीं मनुष्यकृतच आहे. ज्ञानांत आणि संघटित प्रयत्नांत त्याचं निराकरण करतां येईल.

मानवी सुखदुःखाकडे कलावन्ताच्या दृष्टीनं पहायला मी शिकलों आहें. म्हणजे असं, कीं सुखदुःखांचा तात्त्विक विचार करतांना फारशा खोलांत न शिरतां दोहोंतलंही सौंदर्य अनुभवणं शक्य आहे असं मला वाटतं. मुलाचे फाजील लाड पुरविणाऱ्या आईसारखं हें मानवी जीवित नसून एखाद्या किंचित्

कठोर शिक्षकासारखं तें आहे. त्याच्याकडून ज्ञान घेतांना प्रसंगीं छडीचे तडाखे खावे लागतील; पण ती विद्या आणि जें शहाणपण मिळेल, त्याचा आनंद अनुपमेय आहे. आनंद म्हणजे कांहीं आयता तयार मिळणारा माल नव्हे. आपल्या कर्तृत्वांत अन् वृत्तींत तो उत्पन्न होऊन आपल्याला उपभोगायला मिळत असतो. कलावंत आपल्या प्रतिभेच्या साहाय्यानें सौंदर्य निर्माण करतो, तद्वतच माणसानं स्वतःच्या अंतःकरणाची प्रसन्न वृत्ति त्या त्या अनुभवांत घातली, कीं त्या अनुभवांत आनंद प्रकट होत असतो. आज जीवित पूर्ण आनन्दमय नसलं तरी त्यांतला आनंदाचा भाग वाढविणं हें प्रत्येक व्यक्तीचं कर्तव्य आहे. ज्या या संसारांत मी जन्मलों त्यांतून मृत्यूच्या दारांनीं बाहेर पडण्यापूर्वी त्याचं स्वरूप अधिक सुंदर करण्यासाठीं मीं माझ्या सामर्थ्यानुसार झटल पाहिजे. माझ्या पूर्वजांच्या सर्व बऱ्यावाईट कृत्यांचं भांडवल मी जन्मलो तेव्हां माझ्या नांवावर होत त्याच्या व्याजांतून मीं माझ्या सुखाचा वांटा घेतला अन् माझ्या मागून येणाऱ्यांना अधिक सुख मिळावं यासाटीं सुखाच्या गंगाजळींत मीं शक्य तेवढी भर घातली पाहिजे! ही कलावंतांची दृष्टि माणसानं सतत ठेवली पाहिजे; तरच जीविताच्या धडपडींत रंगून जाणं त्याला पुष्कळसं सोपं वाटेल!"

[प्रो. फडके याची गाजलेली भाषणें या पुस्तकांतून]

## फडक्यांचें आत्मचरित्र

माझ्या कादंबरींतील कोणतीं पात्रें कोणत्या ओळखीच्या

माणसांवरून सुचलेलीं आहेत, आणि माझ्या कादंबऱ्यांत आत्मचरित्राचा भाग कितीसा आहे तें लिहिण्यापर्यंत या लेखाचा ओघ आला आहे असें वाटून वाचक कदाचित् अधिक सावधान होऊन येथून पुढें वाचणार असतील, पण त्या बाबतींत या ठिकाणीं इतकेंच सांगतों, कीं कादबरीकार जीं पात्रें निर्माण करितो, तीं एकेका व्यक्तीचीं पूर्ण चित्रें कधींच नसतात. एकेका कल्पित पात्रांत परिचयांतल्या अनेक व्यक्तींचा समावेश झालेला असतो. आणि आत्मचरित्राविषयीं म्हणाल तर एक आख्यायिका सांगतों म्हणजे झालें.

एका विख्यात इंग्रज कादंबरीकाराला एकदां एक मैत्रीण म्हणाली,

"तुम्ही एकदां आपलं आत्मचरित्र लिहा."

यावर तो कादंबरीकार म्हणाला,

"मग आजपर्यंत मीं दुसरं काय लिहिलें आहे अशी तुमची कल्पना आहे ?"

[साहित्य आणि संसार : माझ्या आयुष्याचा माझ्या लेखनावरील परिणाम, ११८]



# नारायण सीताराम फडके

एम्. ए.,

तत्त्वज्ञान विषयाचे प्राध्यापक, राजाराम कॉलेज, कोल्हापूर

यांचा

## ले ख न सं भा र

---

### कादंबऱ्या

१ अल्लाहो अकबर
२ कुलब्याची दांडी
३ जादूगार
४ दौलत
५ अटकेपार
६ निरंजन
७ कलङ्कशोभा
८ उद्धार
९ काश्मिरी गुलाब
१० आशा
११ प्रवासी
१२ समरभूमि
१३ उन्माद

### लघुकथा

१ प्रो. फडके यांच्या गोष्टी भाग १ ला
२ प्रो. फडके यांच्या गोष्टी भाग २ रा
३ लोला व इतर गोष्टी

### नाटकें व नाटिका

१ युगान्तर
२ संजीवन
३ तोतया नाटककार
४ जडावाची देवी
५ आगलावी
६ क्षमेसाठीं अपराध

## चरित्रें

१ दादाभाई नौरोजी   २ टेरेन्स मॅक्स्विनी   ३ डी व्हॅलेरा

## प्रबन्ध

१ मानसोपचार } डॉ. गणपुले यांचे साह्यानें
२ मानसोन्नति }
३ सुखाचे संसार
४ संततिनियमन
५ आजकालचे तरुण स्त्रीपुरुष व त्यांजपुढील प्रश्न
६ आधुनिक गीता
७ मानसमंदिर
८ प्रतिभासाधन
९ साहित्य व संसार
१० वाङ्मयविहार
११ टाकीचे घाव
१२ 'मनोहर'ची आकाशवाणी
१३ प्रो. फडके यांचीं गाजलेलीं भाषणें

## रसात्मक निबन्ध

१ गुजगोष्टी
२ नव्या गुजगोष्टी

## संकीर्ण

१ टांकाच्या फेकी
(शं. वा. किर्लोस्कर यांच्या साह्यानें)
२ गाजलेलीं भाषणें

## इंग्रजी

1 Sex Problems in India
2 Psychology
3 Elements of Ethics
4 History of Philosophy
5 Birth Control